


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २९७

एप्रिल, मे, जून २००१

अनुक्रमणिका



# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपादक

प्रा. रा. श्री. जोग

| | |
|---|---|
| खंड १ ला | रु. ४००/- |
| खंड २ रा भाग-१ | रु. ३५०/- |
| खंड २ रा भाग- २ | रु. ३००/- |
| खंड ३ रा | रु. ३५०/- |
| खंड ४ था | रु. ४००/- |
| खंड ५ वा भाग-१ | रु. ३५०/- |
| खंड ५ वा भाग-२ | रु. ३५०/- |
| खंड ६ वा भाग -१ | रु. ३५०/- |
| खंड ६ वा भाग-२ | रु. ३००/- |
| | रु. ३,१५०/- |

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९७
एप्रिल-मे-जून २००१



संपादक
प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड, पुणे - ४११ ०३०.
दूरध्वनी : ४४७ ४९ ६३.

अनुक्रमणिका







# - अनुक्रमणिका -






मुद्रक-प्रकाशक : ह. ल. निपुणगे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ३०.

मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, पुणे ४११ ३०.

अक्षरजुळणी : रोहिणी ग्राफिक्स, १०२५/व, सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०. फोन : ४४७१४३९

मूल्य : रुपये ३०/- वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : रु. १००/-

आजीव सदस्य शुल्क : रुपये १०००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. १००/-

अंक क्र. २९७ : एप्रिल २००१ ते जून २००१

*(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेलच असे नाही.)*


---

○

# संपादकीय

मी म्हणजे अरविंद वामन कुळकर्णी. पाठीशी पस्तीसेक वर्षांची प्राध्यापकी, थोडेफार काव्यलेखन आणि समीक्षालेखन. शिवाय थोडीफार प्रसिद्धी मिळालेली आहे, ती श्रीं. शरद जोशींच्या शेतकरी संघटनेचा कार्यकर्ता म्हणून. त्या रस्त्याला वळलो तोही त्यांच्या नव्या विचारांच्या आकर्षणाबरोबर घरच्या शेतीत वर्षानुवर्षे अनुभवलेल्या कमालीच्या आर्थिक नुकसानीतून. नानाविध रंगछटा, आकार, गंध, चवी, स्पर्श, या सर्वांतील विलोभनीय स्थित्यंतरे असे गुणात्मक आणि एका दाण्याचे शंभर दाणे बनविणारे संख्यात्मक असे काळजाबरोबर पोटही भरविणारे सर्जनसामर्थ्य शेतीसारखे दुसरीकडे आढळणे कठीण. त्याचा मोहही तसाच बलवत्तर. असे सामर्थ्य असूनही या जोशींमुळे शेती आणि शेतकरी यांच्या कायम दुरवस्थेमागचे सुलतानी कारण समजले. (तोवर ठाऊक होते ते फक्त अस्मानी कारण!) ते अनुभवांनी पटले आणि मी त्यांच्या संघटनेचा एक (लेखक) पाईक होऊन गेलो. अजूनही आहे. इतका की संघटनेसाठी मी विधानसभेची एक निवडणूकही लढविली आणि भुईसपाट होताना अनामत रक्कमही गमाविलेली आहे. पण त्या वेळीही 'विजयासाठी माझी कविता कधीच नव्हती । म्हणून तिजला पराभवाची नव्हती धास्ती' या कुसुमाग्रजांच्या ओळींनीच आम्हा मूठभर मित्रांचा दम टिकविला होता!

तर अशा माझी म. सा. प. च्या नवनिर्वाचित कार्यकारिणीने ८ एप्रिल २००१ च्या पहिल्या बैठकीत म. सा. पत्रिकेच्या संपादकपदी पाच वर्षांसाठी एकमताने निवड केली. कार्याध्यक्ष डॉ. गंगाधरपंत जोगळेकर या मित्रवर्यांचा दूरध्वनीवरून निरोप मिळाला आणि मी परिषदेत दाखल झालो. तिथे सर्वांचे आभार मानताना मी जे सांगितेल तेच मला इथे म. सा. पत्रिकेच्या सर्वच वाचकांना सांगावयाचे आहे. ते म्हणजे पत्रिकेला एका चांगल्या वाङ्मयीन नियतकालिकाचा दर्जा देण्याचा मी सर्वतोपरी प्रयत्न करीन. (आणि आता जोडायचा ताजा कलम म्हणजे, त्याआड मी माझे साहित्यबाह्य उद्योग येऊ देणार नाही!)

समीक्षाव्यवहाराच्या बावतीत पत्रिकेचे स्वरूप खुल्या व्यासपीठाचे असेल. विशिष्ट भूमिकाच महत्त्वाची राहणार नसून वाङ्मयाविषयीच्या किंवा कलेविषयीच्या सर्वच दृष्टिकोणांना 'पत्रिके'त स्थान असेल. व्यक्तिशः माझा कल जीवनवादाकडे झुकणारा असल्याचे 'पत्रिके'च्या अनेक हितचिंतक वाचकांना ठावके आहे. त्यामुळे साहित्याच्या आकलनाला सामाजिक शास्त्रांच्या आकलनाची आणि मदतीची जरुरी आहे, असा माझा विश्वासही आहे. पण मी हे येथे मुद्दाम नमूद करू इच्छितो की पत्रिकेचे संपादन करताना मी माझे आग्रह निर्धारपूर्वक बाजूला ठेवीन. मला व्यक्तिशः फारसे अर्थपूर्ण न वाटणारे

वाङ्मयविषयक दृष्टिकोण, भूमिका यांनाही 'पत्रिके'त जरूर स्थान मिळेल. फक्त एकाच गोष्टीची अपेक्षा असेलं की (संपादक म्हणून) मला अनुकूल किंवा प्रतिकूल वाटणारा दृष्टिकोण सुघटित स्वरूपात मांडलेला असावा. सुव्यवस्थित स्वरूपात मांडली गेलेली कोणतीही भूमिका 'पत्रिके'ला वर्ज्य असणार नाही, याची सर्व संबंधितांनी आवर्जून नोंद घ्यावी. शेवटी, एकांगी आग्रह साहित्याच्या संस्कृतीच्या विकसनाला अडचणीत टाकणारे होतात, हे सत्य मनात सतत बाळगूनच 'पत्रिका' आपला व्यवहार करील, असा विश्वासही सर्वांनी बाळगावा. 'पत्रिके'ला तसा मोकळाढाकळा संसार करू द्यावा, अशी समस्तांना आग्रहाची विनंती आहे.

समीक्षेचे क्षेत्र आज बरेच गुंतागुंतीचे झालेले आहे. कालपर्यंत त्रासदायक वाटणारा अस्तित्ववाद आज आपल्या पचनी पुष्कळसा पडलेला आहे. भालचंद्र नेमाड्यांच्या कृपेने तो खूपच सोपा सोपा झालेला आहे. पण अजून संरचनावाद आणि विरचनावाद यांसारख्या भूमिका कष्टप्रदता टिकवून राहिलेल्या आहेत. अशा आणि इतर (दलित, ग्रामीण, स्त्री वगैरे) आशयानुगामी 'वादां'बद्दलचा मजकूर प्रसिद्ध करण्यास 'पत्रिके'ला नेहमीच आनंद वाटेल. तो मिळविण्यासाठी संपादक नेहमीच प्रयत्नरत राहील. नवे शैलीविज्ञान, संरचना आणि विरचना अशांची अल्प प्रमाणात मराठीत सैद्धांतिक चर्चा झालेली आहे. पण त्यांची उपयोजना मात्र कुठे झालेली आढळत नाही. प्रसंगी जाणकारांची मनधरणी करून ही उणीव भरून काढण्याचा 'पत्रिके'चा सतत प्रयत्न राहील.

यावरोवरच, संस्कृतातून परंपरेने प्राप्त झालेल्या आणि आज किंचित दुरावल्यागत झालेल्या साहित्यविषयक संकल्पना नव्याने सादर करणे 'पत्रिके'ला नेहमीच अगत्याचे वाटेल. यात अर्थातच 'जुने ते सोने' पद्धतीच्या अभिनिवेशाला स्थान नक्कीच असणार नाही. पण आजच्या संदर्भातही भरतमुनी, भामह, आनंदवर्धन, अभिनवगुप्त, कुंतल, राजशेखर वगैरेंचे साहित्यविषयक विचारांबद्दलचे कार्य डोंगराएवढे आहे याचे 'पत्रिके'ला कधीही विस्मरण होणार नाही. असा जुना धागा नव्या प्रकाशात जोपासतच 'पत्रिके'चा प्रत्येक अंक उभा राहावा, असाही संपादकाचा प्रयत्न राहील. असे वाटते की आश्वासनांची पेरणी इथे थांबवावी. (नव्या समीक्षकांचा शोध हे एक आश्वासन राहूनच गेले की!) ही पेरणीही इतुक्यासाठीच केलेली आहे की 'पत्रिके'च्या जाग्या वाचकांना उद्याला संपादकाचा कान धरता यावा! शेवटी संपादकालाही 'काय कवूल केले होते' पद्धतीची टोचणी हवीच. नाहीतर, जमले ते छापून वितरित केले असा प्रकार केला तरी त्याला त्याची खंत वाटणार नाही!! इथे शेतकऱ्याच्या जमाखर्चाच्या वहीचा दाखला दिला तर तो चपखलपणे (आणि 'पत्रिके'च्या वहुसंख्य वाचकांना नवा वाटून, वरोवर) वसेलही. त्याच्या वहीत 'येण्या'पेक्षा 'देण्या'च्या नोंदीच जास्त असतात. आणि त्या त्याच्या सारख्या स्मरणात असतात.



अनुक्रमणिका

(गेल्या काही वर्षांत म्हणूनच अशा 'देण्या'च्या भयाने अनेक शेतकऱ्यांनी आत्महत्याही केलेल्या आहेत! सदसद्विवेकबुद्धी काही प्रसंगी आत्मघातकी ठरते, असा एक नवा मानसशास्त्रीय निष्कर्ष इथे काढावा काय?) 'पत्रिके'चे संपादन करताना संपादकाबाबत असाच व्यवहार/न्याय असावा, अशी इच्छा आहे. थोडक्यात सांगायचे तर आजमितीला चाललेल्या वाङ्मयव्यवहारातील घडामोडींचे प्राथमिक ज्ञान तरी वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे, त्याला किमान या व्यवहारात काय चालले आहे हे कळविण्याचे काम 'पत्रिके'ने करावे असा मानस आहे. मराठीत आलेले, येत असलेले उल्लेखनीय ग्रंथ, त्यांचा परिचय, जमल्यास त्यांचे मूल्यमापन वगैरे सर्व त्यात आलेच. आता तूर्तास हे इतुके पुरे!

'पत्रिके'च्या संपादनासाठी मदत करणारी एक समिती कार्यकारी मंडळ नेहमी निवडत असते. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी, प्रमुख कार्यवाह ह. ल. निपुणगे या पदसिद्ध पदाधिकाऱ्यांसोबत डॉ. दीपा देशपांडे, डॉ. अरविंद लेले, डॉ. भगवान ठाकूर आणि श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली यांची समिती निवडली गेली आहे; पण नव्या संपादकांनी ही समिती मान्य करून एक वेगळी सल्लागार समिती तयार करण्याविषयी विनंती केली. तीही औदार्यपूर्वक सर्व सभासदांनी मान्य केली. त्यातील नावे आणि ती कशासाठी याबद्दलचा तपशील पुढीलप्रमाणे -

डॉ. आनंद यादव (सौंदर्यशास्त्र आणि समीक्षा), डॉ. वसंत स. जोशी (मध्ययुगीन साहित्य), डॉ. कल्याण काळे (भाषाविज्ञान/व्याकरण), डॉ. द. दि. पुंडे (साहित्याच्या संदर्भात सामाजिक शास्त्रे, वाङ्मयेतिहास आणि समीक्षा) याशिवाय प्रा. सुजाता शेणई यांची खास संपादन-सहाय्यक म्हणून नेमणूक. या सल्लागार म्हणजे माझ्या दृष्टीने मदतनीस समितीला मान्यता दिल्याबद्दल संपादक म्हणून मी सर्वांचे आभार मानतो. डॉ. यादवप्रभृती सर्व मान्यवरांनी सल्लागार म्हणून काम करण्यास आनंदाने मान्यता दिली, यासाठी त्या पाचजणांचाही मी आभारी आहे.

नुकतीच विख्यात कादंबरीकार पु. य. देशपांडे आणि विख्यात विचारवंत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (दिल्लीच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष) यांची जन्मशताब्दी झाली. या अंकासाठी डॉ. बांदिवडेकर आणि डॉ. धडफळे या दोन मान्यवरांकडून अनुक्रमे देशपांडे आणि जोशी यांच्यावर दोन लेख लिहवून घेतले आहेत. पुरेसा वेळ नसतानाही या दोन्ही लेखकांनी वर्ण्य व्यक्तींना यथायोग्य न्याय देणारे लेख लिहून दिले, याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत.

गेल्या काही काळात जीवनाच्या विविध क्षेत्रांतील नामवंतांचे निधन झाले. क्रिकेट खेळाचा बादशहा सर डॉन ब्रॅडमन, संसदपटू इंद्रजित गुप्ता, माजी उपपंतप्रधान देवीलाल, ख्यातनाम कादंबरीकार आर. के. नारायण, चित्रपटातील गीतलेखक प्रेमधवन, चित्रकार



अनुक्रमणिका

मुरलीधर जोशी, भावगीत गायक विश्वास काळे, सभापती जयंतराव टिळक, संसदपटू विठ्ठलराव गाडगीळ, माजी मुख्यमंत्री सुधाकरराव नाईक, सोलापूरचे कवी चंद्रभूषण कुलश्रेष्ठ, गुलबर्गा येथील 'अनुबंध' मासिकाचे संपादक प्रा. चंद्रशेखर कपाले, मुद्रणतज्ज्ञ मोहन वेल्हाळ, क्रांतिकारकांचे चरित्रकार वि. श्री. जोशी, औरंगाबादचे नाट्यदिग्दर्शक पु. य. हौजवाला ऊर्फ बाप्पाजी - अशा या लोकविश्रुत अधिकारी व्यक्ती होत.

या सर्वांच्या निधनाचे पत्रिकेला अतीव दुःख होते आहे. विठ्ठलराव गाडगीळ आणि जयंतराव टिळक यांची महाराष्ट्र साहित्य परिषदेशी, तर सुधाकरराव नाईक यांची विदर्भ साहित्य संघाशी विशेष जवळीक होती. प्रसंगी या तिघांनीही या साहित्य संस्थांना मोलाची मदतही केली होती. त्यांचे ऋण पत्रिका जाहीरपणे मान्य करते आहे.

याशिवाय नजीकच्या भूतकाळात नाटककार शं. गो. साठे आणि वसंतराव कानेटकर, समीक्षक गो. म. कुलकर्णी, विचारवंत शंकरराव खरात (जळगावच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष), कादंबरीकार मालतीबाई वेडेकर यांचे वृद्धापकाळामुळे निधन झाले. त्यांच्याबद्दलचे स्वतंत्र कृतज्ञता-लेख या अंकात प्रसिद्ध केलेले आहेत.

हा अंक तसा थोडासा घाईत निघतो आहे. परिषदेच्या कार्यालयातील कर्मचारी, पदाधिकारी आणि मुद्रक यांना त्यासाठी विशेष श्रम घ्यावे लागले आहेत. त्यांचे ऋण मान्य करायलाच हवे. या अंकात काही उणिवा निघतीलच. त्याकडे औदार्याने पहावे, अशी विनंती आहे. वाचकांकडून काही सूचना आल्यास संपादकाला आनंदच होईल. अस्तु. इति लेखनसीमा ॥

१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता,
पुणे - ४११ ०३८. दूरध्वनी - ५४३६१२९



## म. सा. म. मं. चे नवे पदाधिकारी

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे कार्यालय १ जून २००१ पासून पुणे येथे आलेले आहे.

यापुढे तीन वर्षे ते येथे राहणार असून डॉ. गं. ना. जोगळेकर हे अध्यक्ष, प्रा. द. पं. जोशी (हैदराबाद) हे उपाध्यक्ष, श्री. रत्नाकर कलकर्णी हे कोषाध्यक्ष आणि श्री. ह. ल. निपुणगे हे कार्यवाह म्हणून नियुक्त झालेले आहेत.



# तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी : एक 'विभज्यवादी' विचारवंत

(२७-१-१९०१ ते २७-५-१९९४)



- प्रा. डॉ. मो. गो. धडफळे

## "विचार आजमितीलाही मार्गदर्शक"

आधी रामायण सांगितलं गेलं आणि मग म्हणे रामायण घडून आलं. शब्दांच्या मागून अर्थानं धाव घेतली (वाचमर्थोऽनुधावति). वाल्मीकींची दिव्य प्रतिभा या स्वरूपाची होती. अशा प्रकारचं प्रतिभेचं लेणं तर्कतीर्थांना लाभलं नव्हतं. मात्र समोर असलेल्या विषयांचं शास्त्रशुद्ध, तार्किक विश्लेषण करून त्यांच्यातील ग्राह्य-अग्राह्य अंशांचं नेमकं प्रतिपादन करण्याची विलक्षण वैचारिक क्षमता त्यांच्याकडे होती. तर्कतीर्थांच्या वैचारिक योगदानाची जरादेखील ओळख करून न घेता आणि त्यांच्या विपुल व मौलिक लेखनाचं काहीही वाचन न करताही त्यांच्याविषयी बोलताना "तर्कतीर्थांचे विचार आजमितीलाही मार्गदर्शक" असं बोलून वृत्तपत्रांना ठळक मथळ्याचं वाक्य पुरविणाऱ्या व्यक्तींच्या वचनांनाही खरीखुरी अर्थवत्ता प्राप्त होते, ती याचमुळं. आजमितीला गाजत असलेला एक विवाद्य विषय म्हणजे फलज्योतिषासकट प्राचीन भारतीय ज्योतिर्विज्ञान विद्यापीठीय स्तरावर 'विज्ञान' म्हणून शिकवलं जावं का नाही? तसं ते शिकवलं जावं असा विद्यापीठ आयोगाचा फर्मानवजा फतवा आहे.

डॉ. जयंत नारळीकरांसारखे थोर वैज्ञानिक याला कसून विरोध करीत आहेत. डॉ. वसंत गोवारीकर यांना हा 'वैज्ञानिक युगातील घातक निर्णय' वाटतो. डॉ. चित्रा नाईक "कोणत्या पुराव्याच्या आधारे हा निर्णय घेतला?" असा खडा सवाल करतात. डॉ. जनार्दन वाघमारे याला "संस्कृतीच्या नावावर अंधश्रद्धा आणण्याचा प्रयत्न" समजतात. कृ. प्र. वाईकरांसारख्या अगदी मोजक्या व्यक्तींनाच 'सरकारच्या उपक्रमाला पाठिंबा' द्यावासा वाटतो, तर संगणकतज्ज्ञ डॉ. विजय भटकर "ज्योतिर्विज्ञानाच्या सर्व अंगांचा निदान शोध घेऊनच याबाबत निर्णय घ्यावा" असा सबूरीचा सल्ला देतात. या सर्वच बाबतीत तर्कतीर्थांचं मत काय पडलं असतं हे त्यांच्या 'वैदिक संस्कृतीचा विकास' ह्या बहुमोल ग्रंथाची १९६ ते २०० ही पानं आपल्याला सांगतील." प्राचीन भारतातील गणित व फलज्योतिष या विद्या गणित-ज्योतिषाचे भाग म्हणून प्रथम निर्माण झाल्या व वाढल्या.



अनुक्रमणिका






फलज्योतिष हे विज्ञान नव्हेच. अवलोकन व मोजमाप करून व केलेले अवलोकन तर्कशुद्ध रीतीने तपासून फलज्योतिष निर्माण झाले असे म्हणता येणार नाही. गणित व गणित-ज्योतिष ही खरीखुरी विज्ञाने होत. बऱ्याच ज्योतिषग्रंथांमध्ये गणित व फलज्योतिष हीही समाविष्ट केली आहेत. काहींनी गणित-ज्योतिष व फल-ज्योतिष यावर स्वतंत्र पुस्तके लिहिली आहेत....... वराहमिहिराची वृहत्संहिता हा फलज्योतिषावरील महत्त्वाचा ग्रंथ आहे. या मोठ्या ग्रंथात इतरही माहिती पुष्कळ आहे. भारतीयांच्या तत्कालीन धार्मिक व लौकिक जीवनाचे अध्ययन करण्याच्या दृष्टीने या ग्रंथाचे फार महत्त्व आहे. " वरील अवतरण हे तर्कतीर्थीय विचारपद्धतीतील तौलनिक युक्ततेचा एक खासा नमुना आहे. यातील मार्गदर्शन सुस्पष्ट आहे. फलज्योतिष हे विज्ञान नाही; गणित ज्योतिष हे खरंखुरं विज्ञान आहे. बृहत्संहिता ही मुख्यत्वे फलज्योतिषाला वाहिलेली असली तरी त्यामुळे ती पूर्णपणे त्याज्य ठरत नाही, कारण तत्कालीन भारतीयांच्या धार्मिक व लौकिक जीवनाचे ऐतिहासिक पुरावे तिच्यात मिळतात.

या एकूण विचारप्रणालीसाठी मी पालि-बौद्धधर्मीय परिभाषा वापरतो. ही 'विभज्जवादी' (सं. विभज्यवादी) विचारसरणी आहे. गौतमबुद्ध हा 'विभज्जवादी' होता. ऱ्हिस डेव्हीडस व स्टीड यांचा पालि-आंग्लकोश या शब्दाचं स्पष्टीकरण `the religion of logic and reason' ('तर्क' व 'युक्तता' असणारा विचारसम्प्रदाय) असं देतो. 'तर्क-तीर्थ'ता (किंवा तर्कपावनता) ही तर्कतीर्थांच्या विचारसरणीची कायम बैठक होती. तर्कनिष्ठ, शास्त्रपूत, समंजस व व्यवहार्य विवेकशीलता हे त्यांच्या विचारांचं स्वरूप होतं. या विभज्यवादाच्या परिभाषेत तर्कतीर्थांच्या कार्याचा व वैचारिक योगदानाचा संक्षेपात, सूचकतेनं (suggestivly) पण पूर्ण आढावा, मूल्यमापनासकट घेता येईल, असा माझा विश्वास आहे. हां! आता विभज्यवाद एकदा कां आपणही स्वीकारला की तर्कतीर्थांच्या विचारातीलही ग्राह्य-अग्राह्यता आणि त्यांच्या कार्याच्या थोरवीबरोबरच त्यातील मर्यादा यांचाही उल्लेख अटळ ठरतो.

## 'स्वयं-बुद्ध' अथवा 'प्रत्येक-बुद्ध'..

हा 'विभज्यवाद' शास्त्रीजी गौतम बुद्धापासून शिकले नाहीत. बुद्धाच्या ठिकाणी तो जसा स्वतः निर्माण झाला तसाच शास्त्रीजींच्या तार्किक चिंतनातून तो आपोआप अवतरला. याचमुळं शास्त्रीजींचे विचार कधीच एककल्ली ठरले नाहीत. मार्क्सवादाच्या परिपूर्ण अभ्यासानं त्यांच्यावर मार्क्सचा प्रभाव निश्चितपणे निर्माण झाला, पण ते 'मार्क्सवादी' कधीच बनले नाहीत. सिग्मंड फ्राइडचा मानसविश्लेषणवाद व्यवस्थित समजावून घेऊनही केवळ 'कामानुसारी मनोविश्लेषणा'शी ते थांबून राहिले नाहीत. मानवेन्द्रनाथ रॉय हे केवलानंदांनंतरचे त्यांचे दुसरे वैचारिक गुरू. नवमानवतावादी - विचारसरणीचा विश्वाचा

खराखुरा नागरिक होणं' या ध्येयानं शास्त्रीजी भारावून गेले होते यात संशय नाही. पण विचारप्रसारणाच्या बाबतीतला रॉय यांचा काहीसा विक्षिप्त ढंग त्यांनी कधीच अंगिकारला नाही. रॉय यांच्या वैचारिक प्रसारातला मुख्य अडथळा खरा तर मानवेन्द्रनाथ रॉय हेच होते. प्रागतिक मानवतावादात अभिप्रेत असलेलं मानवाचं 'प्राथम्य' आणि 'श्रेष्ठत्व' हे शास्त्रीजींच्या मनावर चांगलंच ठसलं होतं; पण त्याचबरोबर प्राचीन भारतीय साहित्याच्या साक्षात्परिचयामुळं हेच तत्त्व महाभारताच्या शान्तिपर्वाच्या २९७ व्या अध्यायात 'गुह्यं ब्रह्म तदिदं ब्रवीमि, न मानुषात् श्रेष्ठतरं हि किञ्चित्' ("रहस्यात्मक विचार सांगतो, तो असा की माणसाहून अधिक थोरवीचं असं काही नाही") सांगितलं आहे हे ते जाणत होते. पण हे 'पुराण-वचन' रॉयना सांगण्यात हशील नाही, हे त्यांची व्यवहार-बुद्धी त्यांना सांगत होती. रॉयना भूतकालीन ध्येयांना मूलरूपात किंवा नवा वेष देऊन सादर करण्याबाबत एक प्रकारची ॲलर्जी होती. (वैसंवि. पृ. ४६८). भूतकाळाच्या अवशेषांचा जीर्णोद्धार करण्यानं भूतकाळाची बंधनं अधिकच बळकट होतात अशी त्यांची धारणा होती. म्हणूनच 'जुने जाऊ द्या मरणालागुनि' या वृत्तीचा अतिरेक करणाऱ्या आपल्या गुरुजींना काही सांगण्याच्या फंदात न पडता त्यांच्या प्रतिपादनातील ग्राह्यांश स्वीकारून त्यांच्याविषयी मार्मिकपणानं मीमांसकांच्या 'अर्थवाद' शैलीचा अवलंब करून शास्त्रीजी लिहितात, "जुन्या व नव्या देवांच्या विरोधी, धाडसी व मूर्तिभञ्जक प्रवृत्तीचा कळस म्हणजे मानवेन्द्रनाथ रॉय." (तेथेच).

आपल्या मौलिक "वैदिक संस्कृतीचा विकास" या ग्रंथाच्या समर्पणपत्रिकेवर शास्त्रीजी उद्धृत करतात नेमका ऋग्वेदातील विरुद्ध आशयाचा अर्थगर्भ मंत्र - "अयं पन्था अनुवित्तः पुराणो यतो देवा उदजायन्त विश्वे" (ऋग्वेद ४.१८.१)

("हा अनुसरलेला प्राचीन मार्ग आहे. यात सर्व देव प्रकट झाले आहेत.")

सिग्मंड फ्रॉइड हा विश्लेषणर मानसशास्त्राचा प्रवर्तक मानला जातो. शास्त्रीजी फ्राईडवर पडलेल्या संभाव्य बौद्ध प्रभावाविषयी प्रतिष्ठित तर्क बांधू इच्छितात. बुद्धाच्या योगविद्येचं भाषान्तराद्वारा त्यानं अध्ययन केलं असावं असं सुचवतात. (वैसंवि. पृ. १८१). मला त्यांचं हे संशोधन फार मोलाचं वाटतं. जर्मन तत्त्वज्ञ शॉपेनहॉवर याच्या तत्त्वज्ञानावर 'ऑउफनिखाट्' (उपनिषदं) यांच्या फारसी-ग्रीक अशा माध्यमांद्वारा निर्माण झालेल्या भाषांतराची विलक्षण छाप होती. कामवृत्ती (Libido) आणि त्याचबरोबर निर्वाण-तत्त्वाचं (Nirvana principle) आकर्षण असं एक गृहीतक स्वीकारूनच फ्रॉइडनं 'सुखाकर्षण तत्त्वाच्या पलिकडे' (Beyond pleasure principle) हा सिद्धान्त मांडला असावा असं ते म्हणतात. तर्कतीर्थांच्या 'मूलगामी' विचारसरणीचं मला फार अप्रूप आहे. बुद्धाच्याही अगोदर जीवात्म्याची नैसर्गिक स्थिती ही 'काममयोऽयं पुरुषः' (बृहदारण्यक ४.४.५) अशी असल्याचं उपनिषदांनी केलेलं प्रतिपादन ते आपल्या नजरेस आणून देतात.

विभज्यवादाप्रमाणेच 'मूळ हुडकून काढण्याच्या प्रवृत्तीला' बौद्ध परिभाषेत एक खास नाव आहे - 'योनिसो मनसिकार' ('योनिशः मनस्कार' - Radical thinking - 'योनि' म्हणजे मूळ; 'मनस्कार' म्हणजे विचार) "शास्त्रीजी, तुम्ही या पालिबौद्ध वचनाचंही मूळ उपनिषदातील 'यथान्यायं यथायोनि' या पदावलीत आहे असं दाखवून दिलं असतं तर मला अधिक आनंद झाला असता" असं मी म्हटलं की शास्त्रीजी खुलायचे आणि माझ्या हातावर टाळी द्यायचे. पालि त्रिपिटकातलं "अलायरामा खो पनायं पजा, आलयरता, आलयसम्मुदिता' म्हणजे 'ही सर्व प्रजा कामरामा, कामरता' आहे या अर्थाचं वाक्य सांगितलं की मी फारच काही मोलाचं सांगतो आहे असा आविर्भाव करून मला ते तिथल्या तिथं लिहून द्यायला सांगत.

## मार्क्सवादाचं भारतीय वृत्तीनं आकलन

शास्त्रीजी मूळ वैदिक पठडीतील. संस्कृतचे निष्णात विद्यार्थी. 'स्मृती' म्हणजे धर्मशास्त्राचे विशेष अभ्यासक. आपले गुरू केवलानंद सरस्वती (नारायणराव मराठे) यांच्यावरोबर स्मृतींची पारायणं करून त्यांनी धर्मकोशाच्या खंडांचं संपादन केलं. या पार्श्वभूमीवरच पुढे इंग्रजीचा परिचय करून घेऊन 'मार्क्सवाद' त्यांनी समजावून घेतला. मनाची भूमी भारतीय विचारांच्या सरींनी भिजलेली. तिच्यात 'जडवाद', 'विरोधविकासवाद', 'उत्पादन साधनांचं महत्त्व', 'साम्यवाद' अशा पदांच्या बिया पेरल्या गेल्या. सगळ्यात जास्त पीक फोफावलं ते 'धर्माची चिकित्सा हीच सर्व प्रकारच्या चिकित्सेचं मूळ आहे' ह्या विचारसरणीचं. नागपूरला १९४१ साली म्हणजे वयाच्या ४१ व्या वर्षी परांजपे व्याख्यानमालेत हिंदुधर्माची जी चिकित्सा शास्त्रीजींनी केली त्यावर मार्क्सवादाची गडद छाया होती. कै. मे. पु. रेगे प्रभृतींनाही असंच जाणवलं आणि तशा प्रकारची कबुली खुद्द शास्त्रजींनीही प्रांजळपणानं दिलेली होती. पण शास्त्रीजींच्या स्वतःच्या या कबुलीनं आपण फार चकून जाऊ नाही, असं मला वाटतं. जडवाद हा भारतीय सांख्यप्रणालीत, लोकायतदर्शनात आणि बऱ्याच प्रमाणात वैशेषिकांच्या 'धर्मा'मध्ये अभिप्रेत आहे, हे शास्त्रीजी निश्चितच जाणत होते. कै. कॉम्रेड रघुनाथ कऱ्हाडकर उपनिषदांत 'विरोधविकासवाद' असल्याचा सातत्यानं दावा करीत होते. म्हणूनच शास्त्रीजींच्या विचारांवर मार्क्सच्या 'वादा'चा प्रभाव होता असं म्हणण्यापेक्षा मार्क्सवादी विचारपद्धतीची, परिभाषेची व विश्लेषक शैलीची मोहिनी होती असं म्हणणं मला जास्त रास्त वाटतं. पुढे पुढे ही मोहिनीही कमी होऊ लागली. मूळ भारतीय आध्यात्मिक श्रेष्ठतेची मनावरची पकड अधिक वाढू लागली. केवळ भाकरीच्या भुकेहूनही आणखी कसली तरी अनामिक भूक व तहान खरोखरीच असू शकते याचं भांन येत गेलं. या सर्व नवीन भानाचं एक फार सुंदर वैचारिक फळ म्हणजे शास्त्रीजींचा 'वैदिक संस्कृतीचा विकास' हा परिपूर्ण ग्रंथ. या एका पुस्तकाच्या वाचनानंही समग्र 'तर्कतीर्थ-दर्शन' घडेल असं मला वाटतं. इथली 'कबुली' जास्त मोलाची आहे. ती म्हणजे "आध्यात्मिक

किंवा वैचारिक स्थिर मूल्यांची शक्ती समाजातील भौतिक प्रवृत्तीवरही आधिपत्य गाजवू शकते." मार्क्सवादाच्या पलीकडची शास्त्रीजींची ही धारणा 'उजव्या' आणि भारतीय-विचाराच्या समर्थकांना कमालीची आवडेल अशीच आहे. तपशीलाचा फार प्रपंच न करता आणखी एक गोष्ट सांगू इच्छितो. आयुष्यात प्रथमपासून शेवटपर्यंत शास्त्रीजी आपल्या लेखनातून व भाषणातून एका विचाराचा सातत्यानं प्रसार करत होते. 'धर्ममीमांसा' किंवा 'सातत्यानं धर्माची प्रागतिक चिकित्सा' व त्याबरोबरीनं धर्मग्रंथांचं अनेकविध निकषांनी केलेलं नवंनवं अर्थापन हे हिंदुधर्माचेच वैशिष्ट्य आहे. विधान स्वच्छ, पूर्णपणे ऐतिहासिक व सुखावह आहे. "अहो, कसला फ्रॉईड अन् कसला मार्क्स? सरतेशेवटी पिंपळनेरच्या मातीतले आणि वाईच्या गंगातीर्थी स्नान करणारे, नेसूचं धोतर अन् गळ्यात जानवं असलेले यजुर्वेदी जोशीच ते!" असं यावावत कोणी म्हटलं तर झटकन् प्रतिक्रिया देण्यात मी बहुतेक वेळा अयशस्वीच झालो आहे. गमतीनं कोणाला असं म्हणावसं वाटल्यास म्हणावं, पण शास्त्रीजींना एवढं संकुचित करू नाही, असं मला मनापासून वाटतं. त्यांच्यावरचा 'विश्वाचा नागरिक होण्याचा' मानवेन्द्रनाथी संस्कार कधीही पुसला गेला नाही.

## सर्वधर्मीय मैत्री

हिंदुसंस्कृती म्हणजे वैदिक संस्कृतीचाच काळाच्या ओघात झालेला सर्वसमावेशक विस्तार ही शास्त्रीजींची धारणा होती. त्यातील 'धर्ममीमांसा' तत्त्वाविषयी त्यांना सार्थ अभिमान असला तरी फादर लेदर्ले, फादर डीसा, सेठ नोएल यांसारखी किरिस्ताव मंडळी, डॉ. आंबेडकर, लामा रिन पोछे यांसारखे बौद्ध व हमीद दलवाई, मेहरुन्निसा दलवाई, सय्यदभाई, मुमताज रहिमतपुरे यांसारख्या इस्लामधर्मीयांशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. त्यांचा विश्वास तत्त्वबोधपर वादावर होता; वृथा विवादावर व 'वितण्डे'वर नव्हता. एकदा संकेश्वरच्या शंकराचार्यांशी त्यांची जुंपली होती. प्रशासकीय निर्णयामुळे कै. डी. के. बेडेकर विश्वकोशाविरुद्ध न्यायालयात गेले होते. आचार्य अत्र्यांच्या बोलण्यात व लेखनात 'तर्कतीर्थ' या पदाचां वेगळाच पाठ यायचा. या क्षुल्लक वादांचा तर्कतीर्थांनी कधीच बाऊ करून घेतला नाही. वाद चिघळू दिले नाहीत. त्यामुळे अत्रे-माटे, अत्रे-फडके अशा स्वरूपाचे शाश्वतिक विरोध त्यांच्याबाबत निर्माण झाले नाहीत. भारतीय मुस्लीम समाजाविषयीचे तर्कतीर्थांचे विचार तर मोठे उदारपणाचे आहेत. ते म्हणतात, "एका संस्कृतीतील माणसे दुसऱ्या संस्कृतीच्या समाजात गेल्यास त्या संस्कृतीशी तद्रूप होतात, मग ती माणसे कोणत्याही वंशाची असोत. उदाहरणार्थ, भारतीय मुसलमान" (वैसंवि. आवृत्ती ३ री १९९६ - पृ. ७-८)

## व्यापुनि विभज्यवादा शास्त्री 'दशांगुळे' उरले!

'गाळीव' मार्क्सवाद, 'निवडक' नवमानवतावाद व 'आंशिक' फ्रॉईडवाद ही तर्कतीर्थांच्या

विभज्यवादी वृत्तीची निदर्शने झाली. पण विभज्यवाद व्यापूनही तर्कतीर्थ 'दहा अंगुळे' उरतात याचं भान आपण ठेवलं पाहिजे. या त्यांच्या कर्तृत्वाचा एक फार मोठा हिस्सा म्हणे त्यांचे मराठीला योगदान.

## मराठीला योगदान

शास्त्रीजी मूळचे संस्कृतचे, पण जीवनभर अधिक रमले ते मराठीच्या गोतावळ्यात. १९३४ साली त्यांनी 'शुद्धिसर्वस्वम्' म्हणून एक छोटासा संस्कृत प्रबंध लिहिला होता. त्याला फारशी प्रसिद्धी मिळाली नाही. सहकाऱ्यांच्या सहाय्यानं भारतीय राज्य-घटनेचा संस्कृत अनुवाद त्यांनी सादर केला. याखेरीज प्रत्यक्षात संस्कृतमध्ये लेखन त्यांनी केले नाही. काही मोजक्या वादसभांत संस्कृतमध्ये जेवढे बोलले त्या पलिकडे संस्कृतभाषणाकडेही त्यांनी कधी ओढा दाखवला नाही. प्राचीन स्मृतिसाहित्य, वेदांपासून ते जगन्नाथापर्यंतच्या साहित्याचे आलोडन, आनंदमीमांसा (१९३८), हिंदुधर्माची समीक्षा (१९४१), वैदिक संस्कृतीचा विकास (१९५१) ही संस्कृतविचारधनावरील मराठीत, मराठी माणसांसाठी लिहिलेली पुस्तके आहेत. जडवाद (१९४१), ज्योतिनिबंध (१९४७), आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा व रससिद्धांत (१९७३), राजवाडे लेखसंग्रह (१९७३) व लो. टिळकं लेखसंग्रह (१९७६) या संपादनग्रंथांना दिलेल्या विवेचक प्रस्तावना आणि सर्वधर्मसमीक्षा (१९८४) हे सर्व लेखन मराठीतच आहे. डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या इतक्या आग्रही वृत्तीनं नाही तर काहीशा स्वतःच्या सोयीच्या दृष्टीनं म्हणा, तर्कतीर्थांनी जे मराठीत लेखन केलं त्यामुळे शास्त्रीय विषयदेखील मराठीत किती समर्थपणानं मांडला जाऊ शकतो आणि वाचकांपर्यंत सुबोधरीतीनं पोहोचवला जाऊ शकतो याचा एक आदर्शपाठ सहजपणे मिळाला. मराठी विश्वकोश तर ह्याचं दुसरं आणि फार बोलकं व प्रत्ययकारी उदाहरण आहे. शास्त्रीजींचं मराठी शुद्ध, सोपं, लहान वाक्यांनी घडवलेलं, रामदासी पद्धतीचं, रोख-ठोक शैलीचं आणि रोचक आहे. इतरांच्या लेखनाबाबत 'गुंतागुंतीची वाक्यरचना विदग्धतेची द्योतक असते' असं प्रशंसापर लिहिणारे शास्त्रीजी स्वतःची अतिशय प्रगल्भ वाक्यरचना गुंतागुंतीपासून सतत दूर ठेवू शकले. परभाषीय शब्दांचे त्यांचे मराठी अनुवाद फार 'समर्थ' आहेत. Indology म्हणजे 'भारतीय विद्या' नव्हे, 'भारतविद्या'; Anthropology म्हणजे 'मानववंशशास्त्र' नव्हे, 'मानवशास्त्र'. संस्कृत शब्दांचे मराठीतील अर्थ ते आवर्जून सांगत असत. 'कटू' पासून मराठीत 'कडू' शब्द आला खरा, पण संस्कृत 'कटू' म्हणजे तिखट; 'तिक्त' पासून मराठीत 'तिखट' शब्द आला, पण मूळ 'तिक्त' म्हणजे कडू. पु. ल. तर्कतीर्थांना नेहमी एक आग्रह करायचे, "तुम्ही आत्मचरित्र लिहा." पण हे लेखन करण्याचा विचारही कधी शास्त्रीजींच्या मनाला शिवला नाही. जाहीर सभेत शास्त्रीजी भाईंना म्हणाले, "अहो, आत्मचरित्र लिहिणं सोपं नसतं. त्यात स्वतःला फार 'उघडं' करावं लागतं." 'उघडं' म्हटल्यावर पुलंनी नेहमीप्रमाणे चष्म्याच्या वरच्या भागातून पाहत

भिवया प्रश्नार्थक रीतीनं उंचावल्या. त्यावर शास्त्रीजी म्हणाले, "आपण एकटेच जगत नसतो. स्वतःला 'उघडं' करताना स्वतःबरोबर जे जे 'वसले' त्यांनाही 'उघडं' करावं लागेल" आणि यावर मात्र भाई खदखदून हसले. माझी शास्त्रीजींकडून तशी माफक अपेक्षा होती. 'मधूस पत्रे' अशा प्रकारचं 'पत्रलेखन' त्यांनी करावं असं वाटायचं. एवढा अनुभव, एवढं वाचन, एवढी विद्वत्ता असतानाही तर्कतीर्थ 'वाळवोध', 'उपदेशपर' असं फार वोलत नसत. याचमुळं अपवादस्वरूप असलेल्या त्यांच्या मधूला (थोरल्या मुलाला) लिहिलेल्या पत्रातला (८.१२.८१) मजकूर मला उद्धृत करावासा वाटतो.

"जीवन हे एक अंतिम मूल्य आहे. आई-वापांपासून निरोगी व अव्यंग काया लाभावी; आरोग्याचे नियम पाळावे; पृष्ठवंशाच्या दोन टोकांना (जीभ व उपस्थेन्द्रिय) सांभाळावे म्हणजेच मिताहार-विहार असावे. ह्या दोन टोकांना विवेकाने सांभाळण्यात ज्याला यश येते तो मानसिक व शारीरिक जीवन विवेकयुक्त होऊन जगतो."[१] या एका छोट्या उताऱ्यात काय नाही? योग आहे, आयुर्वेद आहे, समग्र जीवनयोगच आहे.

शास्त्रीजींनी आत्मचरित्र लिहिलं नाही. एवढंच नाही तर 'श्री- विद्ये'च्या मधुकाकांना ज्या ग्रंथलेखनाचं आश्वासन त्यांनी दिलं ते 'शंकराचार्य-चरित्र'ही ते लिहू शकले नाहीत. याला कारण 'आलस्य' नव्हतं (ते त्यांच्याकडे कधीच नव्हतं), तर ऐतिहासिक विश्वसनीय आधार त्यांना शोधूनही सापडेनात. जवळजवळ सगळे 'शांकर-दिग्विजय' त्यांनी तपासून पाहिले. अनेक ठिकाणी मीच त्यांच्याबरोबर होतो. माझं मन काही संदर्भांच्या बावतीत उचल खायचं, पण त्या संदर्भांनी त्यांचं समाधान व्हायचं नाही. आता भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या द्वारा डॉ. वा. रा. अंतरकरांचे शंकराचार्यांच्या जीवनावरचे पुस्तक माझ्या प्रस्तावनेसकट छापलं जाणार आहे, मला खात्री आहे. शास्त्रीजी असते तर त्यांनी त्यातील कित्येक भागांबावत स्वच्छपणे असहमती व्यक्तवली असती.

## ज्ञानसिंधूच्या मर्यादा

संस्कृतविषयक अनेक सम्मान शास्त्रीजींना लाभले. राष्ट्रीय संस्कृत पंडित (१९७३), राष्ट्रीय संस्कृत संस्थानाचे सदस्यत्व, संस्कृतविषयक कार्यासंवंधीं राजस्थान संस्कृत संस्थानचा गौरव (जयपूर १९). संस्कृतशी संवद्ध संस्थांचे ते अध्यक्षही होते (वैदिक संशोधन मंडळ व भांडारकर संशोधन संस्था). पण अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषद किंवा विश्वसंस्कृत सम्मेलन यातील एखाद्या विभागाचेही अध्यक्षत्व त्यांना लाभले नाही. मग साधारण अध्यक्षपद (General Presidentship) तर सोडाच! खरं तर १९८३ साली 'इलस्ट्रेटेड वीकलीनं' पन्नास नामांकित व्यक्तींमध्ये गणलेल्या सहा महाराष्ट्रीय व्यक्तींमध्ये शास्त्रीजींचा समावेश होता. पण हा मानाचा निर्देशच म्हणायचा! प्रत्यक्षात महाराष्ट्राची सीमा ओलांडून, अखिल भारतीय पातळीवरही त्यांचे विचार फारसे पोहोचू शकले नाहीत. जागतिक

पातळीवर तर नाहीच नाही. या मर्यादेचं कारण त्यांचं लेखन व भाषण हे मुख्यत्वे मराठीतच झालेले आहे. मराठीला त्यांनी योगदान केलं; मराठीनं त्यांना दिल्लीच्या मराठी साहित्य संमेलनाचं अध्यक्षपद दिलं; पण शास्त्रीजी मराठी भाषक व महाराष्ट्र यापुरतेच मर्यादित राहिले हे मान्य करायेला हवं. त्यांनी स्वतः मान्य केलं असतं. महत्तेचं मूल्यमापन करताना नेहमी ध्यानात धरायला हवं की, किनारा महासागरालाही असतो. शास्त्रीजींच्या मर्यादा म्हणजे ज्ञानसिंधूच्या सीमा. कै. मे. पु. रेगे त्यांच्या काही लेखनाचे इंग्रजी भाषांतर करण्याचा मनसुबा अनेकदा व्यक्त करीत असत. पण त्यानंही फार काही साधलं जाईल, असं मला वाटत नाही. गडकरी इंटरही होऊ शकले नाहीत, पण गडकऱ्यांची नाटकं एम. ए. ला अभ्यासविषय म्हणून लावली जातात व त्यांच्या साहित्यावर शोधप्रबंधही लिहिले गेले आहेत, हे सर्व मान्य करूनही गडकऱ्यांच्या लेखनात इंटरपलिकडच्या औपचारिक शिक्षणाचे महत्त्वाचे संस्कार दिसत नाहीत हेही जाणवतं. या जाणिवेला विभज्यवादी मान्यता द्यायला हवी. तर्कतीर्थांचंही आंग्लपद्धतीनं महाविद्यालयीन शिक्षण झालं असतं तर त्यांच्या कर्तृत्वाला 'चार चंद्रांची कळा' प्राप्त झाली असती. जागतिक थोरवीची चमक-दमक आली असती. मात्र याचा अर्थ इतर कोणतीच पदवी नसल्यानं मराठी माणसांनी त्यांचा मान रहावा म्हणून त्यांना आयुष्यभर 'तर्कतीर्थ' म्हणून संबोधलं असं मानू नये. तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे यांच्या सारख्यांनी 'तर्क' वा 'न्याय' या विषयावर स्वतंत्र पुस्तके लिहिली. विश्वकोशातली एक 'न्यायदर्शन' विषयक नोंद एवढंच काय ते शास्त्रीजींचं या विषयीचं लेखन. पण न्यायविषयी प्रभूत लेखन करूनही विचारात 'न्यायदोष' राहू शकतात. तर्कतीर्थांचे विचार (केवळ शब्दावर कोटी म्हणून म्हणत नाही) मात्र खरोखरच सदैव 'न्याय-पूत' होते. वाईच्या गंगातीर्थीच्या या तर्कतीर्थानं मराठी विचारसरणीला शास्त्रपूतता आणली. मला हे खरंखुरं 'शुद्धि-सर्वस्व' वाटतं. वैचारिक शुद्धी ही खरी-खुरी शुद्धी.

दत्तोपंत पोतदार असताना व विशेषतः ते निवर्तल्यावर महाराष्ट्रातील सर्वविध सभा-सम्मेलनांचा एक अधिकारी अध्यक्ष म्हणून जे कार्य मराठीबाबत तर्कतीर्थांनी केलं आहे, ते केवळ अजोड आहे. वादाच्या भरात टोकाच्या भूमिका घेतल्या जातात, विचार कलायला लागतात, त्यांना टेकू देणं गरजेचं होतं, लाकडी विचारांच्या निबर गाठींवर रंधा फिरवून, त्यांना 'गोलाई' देऊन त्या विषयीचा एक समतोल, समंजस, तर्कपूत 'विभज्यवादी' विचार समाजापर्यंत पोहोचविण्यात शास्त्रीजी विलक्षण यशस्वी झाले. आज म्हणायचं तर विशेषकरून विहार व उत्तर-प्रदेश या प्रांतांना, पण खरं तर भारतातील प्रत्येक प्रांताला एका तरी तर्कतीर्थांचा लाभ जरी झाला तरी हा बुद्धाचा भारत 'सुबुद्ध' व्हायला फार मोठी मदत होईल. अजूनही हवा आहे तो एक अभ्यासू 'विभज्यवादी विचारवंत.'

२, यशोदीप-ब, ज्ञानल मंगलकार्यालयाजवळ,
रामबाग कॉलनी, सदाशिव पेठ, पुणे - ३०. फोन - ४३३२०८१



○

# तत्त्वज्ञ कादंबरीकार पु. य. देशपांडे

(११-१२-१८९९ ते २६-७- १९८६)

○

- चंद्रकांत वांदिवडेकर

पु. य. देशपांडे हे विदर्भाने दिलेले मोठे कादंबरीकार. त्यांचे फार मोठे वैशिष्ट्य असे की फडके-खांडेकर-माडखोलकर यांच्या म्हटल्या जाणाऱ्या युगात लेखन करतानाही त्यांनी एक पूर्णपणे स्व-तंत्र वाट चोखाळली. स्वत्व शाबूत ठेवले. कलेच्या नावाखाली वावरणाऱ्या रंजनवादाची मराठी कादंबरीक्षेत्राला जाणीव करून दिली. निरलंकृत गद्य काव्यात्म भाषेचे पहिले पाठ घालून दिले. मुख्य म्हणजे कादंबरीलेखनाच्या रूढ रुळलेल्या मार्गाला नवे वळण देण्याचा प्रयत्न केला.

पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्या वाचताना संमिश्र प्रतिक्रिया निर्माण होते. वृत्तीने आत्मनिष्ठ कवी, पण माध्यम निवडले ते वास्तववादी, वस्तुनिष्ठ जीवनानुभव व्यक्त करणाऱ्या कादंबरींचे. 'सुकलेले फूल' मध्ये मूलभूत वृत्ती व वाङ्मयप्रकार यातील द्वंद्व जाणवले नाही. पण इतर सर्व कादंबऱ्यांतील दोष वा विसंवाद यातून निर्माण झाले आहेत.

पु. य. देशपांडे यांनी व्यक्तिवादी दृष्टिकोणातून प्रेम, मैत्री, जीवनाच्या सार्थकतेचे क्षण, त्यांच्या दिशा इत्यादी गोष्टींकडे पाहिले आहे. त्यांची समाजवादाविषयीची निष्ठासुद्धा व्यक्तित्वविकासाची अपरिहार्य आवश्यकता म्हणून निर्माण झाली होती. त्यांच्या कलाकृतीत वेगवेगळ्या वृत्ती-प्रवृत्तींची व स्वभावाची बहुरंगी माणसे दिसत नाहीत व त्यांच्यातील संघर्ष, स्वभावभिन्नतेतून निर्माण होण्यापेक्षा विचारभिन्नतेतून निर्माण झालेले दिसतात. कादंबऱ्यांतील सर्व विरोध, ताण व संघर्ष मूलतः विचारांचा असतो व त्या विचारांना अतिशय आत्मनिष्ठेतून आलेल्या आवेगाचे पाठबळ असते. त्यांचा हा आवेग घटनांतून व स्वभाववैभिन्याच्या संबंधातून निर्माण न होता व्याख्यानातून व्यक्त होतो. त्यामुळे शब्दजंजाळाचा भास होत राहतो. पात्रांच्या मुखातून व्यक्त होणारे विचार कादंबरीचा संदर्भ बाजूला ठेवून वाचण्यास चमकदार वाटले, तरी कलात्मक संदर्भात ते अतिशयोक्तिपूर्ण, अति आवेगपूर्ण व कृत्रिम वाटतात. भावनांना उत्कटता देण्यासाठी लेखक अतिशयोक्तिपूर्ण शब्दाचा उपयोग करतो. पु. य. देशपांडे यांचा विचारावर फारच भर आहे. सर्व सृष्टीतील परिवर्तने विचारावर वा विचारावर झालेल्या आघातावर अवलंबून असतात असे त्यांचा प्रभाकर 'बंधनाच्या पलीकडे' (१९२७) या कादंबरीत म्हणतो. विचारांच्या शक्तीवरची

ही प्रचंड श्रद्धा देशपांड्यांच्या पात्रांना विचारांची प्रतीके बनवते. विचारांच्या पलीकडे असलेल्या जीवनाच्या अनंत गुंतागुंतीच्या धाग्यादोऱ्यांची जाणीव ठेवण्याचे कारण राहत नाही. त्यामुळे कादंबरीत एक प्रकारचा एकेरीपणा येतो. ही श्रद्धा मुळातच बुद्धिवादी वाटली तरी रोमँटिक आहे. अशा श्रद्धेमुळे पात्रांची दृष्टी पुष्कळ वेळा वास्तवाच्या जाणवेच्या स्पर्शाने शून्य होते. त्यांची मैना म्हणते, 'ही क्रांती हृदयात खोल रुजून तिच्या पायावर आत्मविश्वासाची अभेद्य इमारत उभारण्याचे कार्य जर कुणी केले असेल तर ते शेलेच्या काव्यात...! समता, स्वातंत्र्य, प्रीती या तत्त्वाचं खरं चैतन्यमय अंतरंग माझ्या अंतःकरणात शेलेनं पटवून दिलं. हृदयभावाचं अमरत्व व कैवल्य माझ्या जीवनात सळसळू लागलं! कल्पनेच्या दिव्य दृष्टीनं मी सभोवार पाहू लागले...' कवितेच्या शक्तीवर व शेलेच्या क्रांतिकारी कवितेच्या सामर्थ्यावर हा प्रचंड(?) विश्वास फारच रोमँटिक वाटतो आणि पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्यांतून अशा अतिशयोक्तिपूर्ण गोष्टी घडत असतात.

जीवनानुभवात विचार पूर्णपणे मुरले आहेत, याचा अनुभव त्यांची आटोपशीर आत्मनिवेदनपर कादंबरी 'सुकलेले फूल' (१९३१) देते. नायिकेच्या मनाचे विश्लेषण तर्काधिष्ठित कार्यकारणभावाने न करता आंतरिक उमाळ्यातून केले गेले आहे. इथे अतिशयोक्तिपूर्ण शब्दांची पखरण नाही. या कादंबरीत व्यक्ती व समाज यांच्या संबंधांचा थोडाफार समावेश असला, तरी सारा भर कृष्णेच्या विशिष्ट मनःस्थितीच्या चित्रणावर आहे. लेखकाची पात्रे कुठेही भाष्ये करीत नाहीत, व्याख्याने देत नाहीत. मात्र हे त्यांच्या इतर कोणत्याही कादंबरीसंबंधी म्हणता येत नाही. 'सदाफुली' मध्ये त्यामानाने कमी भाष्ये आहेत एवढेच.

पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्यांत प्रेमासंबंधी एक आगळी दृष्टी व्यक्त झाली आहे. प्रेम या संकल्पनेचा त्यांनी कादंबऱ्यांतून केलेला विचार महत्त्वाचा आहे. व्यावहारिक जीवनाच्या वास्तवात परस्परसंबंधातून निर्माण झालेलं व धगधगत्या आगीत पक्व होणारं किंवा होरपळून जाणारं, माणसांच्या जैविक मर्यादांचं भान ठेवणारं हे प्रेम नसतं. त्यात चुंबनालिंगनापुरती शारीरिकता असते; पण त्या शारीरिकतेचा माणसाच्या वासनेशी संबंध नसतो. त्याच्या प्रेम या कल्पनेशी असतो. हे प्रेम पुष्कळसे 'प्लेटॉनिक' असते. शाश्वतता, चिरकालिक उत्कटता, स्वार्थापलीकडची उदात्तता यांचे वेड असते. प्रेम ही कल्पना असल्यामुळे माणसाच्या धगधगत्या वासनेतून निर्माण होणारी प्रेमाची विविध रूपे इथे नसतात. प्रेम ही कल्पना अधिक असते. भावना कमी असते. सारे आवेग आणि आवेश कल्पनेतून येतात व शब्दांच्या आतिषबाजीतून व्यक्त होतात.

पु. य. देशपांडे यांच्या प्रणयिनी एका साच्यातल्या वाटतात. रंगरूपाने थोड्या- फार वेगळ्या असल्या तरी त्यांचे व्यक्तित्व कमनीय असते, वृत्ती जवळजवळ सारख्याच असतात. 'बंधनापलीकडे'मधील वेश्याकन्या मैना जीवनाच्या जहरी स्वरुपाची प्रचीती

आल्यामुळे निःसंग बनली होती. पण तिच्या निःसंगपणाची विभावना करणारे प्रसंग पु. य. निर्माण करीत नाहीत; म्हणून ती बोलणारी वाटते, वेदनेने विद्ध झालेली वाटत नाही. कौमार्यभंगानंतरचं तिचं दुःख ती शब्दांतून व्यक्त करते. ते दुःख समाजाशी व त्यातील व्यक्तीशी तिच्या बदललेल्या संबंधातून मूर्त झाले असते तर अधिक कलात्मक झाले असते. 'सुकलेले फूल' मधील विधवा कृष्णेला केशवशी विवाह ठरल्यावर व ठरण्याच्या आधीही वासनात्मक दंश झालेला दिसत नाही. डॉ. दिवाकरांबद्दलच्या तिच्या आकर्षणातही वासनेचा लवलेश नसतो. तिचे त्यांच्याविषयीचे आकर्षण त्यांच्या निगूढ व्यक्तित्वाचा ठाव घेण्याच्या व त्यांच्या उन्मार्गगामी मनावर विजय मिळविण्याच्या सुप्त इच्छेतून निर्माण झाले होते. या निर्विषय प्रेमामुळेच पुढे पंधरा वर्षे दिवाकरांची गाठ न घेताही ती समाधानाने कार्य करू शकते. या प्रेमाने डॉ. दिवाकरांच्या बागेतले विषारी साप पळून गेले. भौतिक दृष्टीनं या सुकलेल्या फुलानं दोघांच्याही चैतन्यमय आत्म्यावर शाश्वत परिणाम केला होता. हीही प्रणयाची तऱ्हा - मैना व कृष्णा दोघींच्या प्रणयभावनेत फारसा फरक नाही.

'सदाफुली' मधील तिमा अधिक मनस्वी आहे, अधिक निगूढ स्वभावाची आहे. तिच्या वृत्तीचे व स्वभावाचे कलावादाशी समीकरण करून पु. य. देशपांडे यांनी कादंबरीला एक वेगळे परिमाण देण्याचा प्रयत्न केला तरी अशा प्रकारची प्रतीकात्मकता पात्राच्या स्वायत्ततेचे मूल्य हरवून बसते. तिमाचे व अशोकचे संबंध सरळ नसतात. तिचे अंतर्मन तनूशी बांधलेले असते. अशोकशी प्रेम, त्याच्याशी विवाह हा तिच्या अंतर्मनातील तनूविषयीच्या आकर्षणाचा भाग असतो. अशोकशी विवाह तनूच्या समाधानासाठी असतो. एक प्रकारे तनूच्या प्रेमासाठी केलेला तो आत्मत्याग असतो. तनू, अशोक व तिमा हा प्रेमाचा त्रिकोण मराठी साहित्यात अगदी वेगळ्या प्रकारचा आहे. याला सूक्ष्म मानसशास्त्रीय बैठक आहे. मात्र तरुण मनातील लैंगिकतेची भावना या सर्व संबंधातून बाद करून पु. य. त्याला अलौकिक रूप देतात; ते काल्पनिक असते. ही पु. य. देशपांडे यांच्या सर्वच कादंबऱ्यांची मर्यादा आहे.

'बंधनाच्या पलीकडे'मध्ये सामाजिकतेचे भान असणारे पु. य. देशपांडे 'सुकलेले फूल' व 'सदाफुली'मध्ये वैयक्तिक मनाचे वैचित्र्य, गुंतागुंत व निगूढता यांवर ध्यान केंद्रित करतात. पुढच्या 'विशाल जीवन' (१९३९) व 'काळी राणी' (१९४१) मध्ये पुन्हा ते व्यक्ती व समाज यांचे संबंध तपासतात. या दोन कादंबऱ्यांमध्ये नायकांना अधिक प्राधान्य मिळालेलं आहे. व्यक्ती व समाज यांच्या गतिशील व परस्परपूरक संबंधांची तीव्र जाणीव ते व्यक्त करतात. व्यक्तिजीवनात निर्माण झालेली कला कितीही सुंदर, मोहक व कीर्तिदायिनी असली तरी विशाल जीवनाची जाणीव झालेला लेखक तिची पर्वा न करता तिचा निमर्मपणे होम करतो, त्याने तो करावा असा एक प्रबल स्वर 'विशाल जीवना'मध्ये

भरून राहिला आहे. या साऱ्या अनुभवांत उच्च मध्यमवर्गीय माणसाच्या विशाल जीवनाच्या आकांक्षा व्यक्त झाल्या आहेत, पण ज्या विषमतेचे, अन्यायचे दारुण दुःख या आकांक्षांचे स्फुल्लिंग फुलवते त्याची प्रत्ययकारी बैठक या कादंबरीत नसल्यामुळे हा सर्व अनुभव पुष्कळसा वैचारिक व भावुक वाटतो. त्यात भव्य व उदात्त आकांक्षा आहेत, पण त्या जीवनानुभवाच्या तशाच विशाल व ठोस बैठकीवर उभ्या केल्या गेल्या नाहीत.

'काळी राणी' (१९४१) मध्येही ज्या व्यापक जीवनाशी प्रकाश एकरूप होऊ इच्छितो त्याचे चित्रण विचार व कल्पना यांच्या परिघातच फिरत राहते. यात रजनीचे विलक्षण वेगळे व्यक्तित्व पु. य. देशपांडे यांनी चितारले आहे. कृष्णा, तिमा व अलका यांच्याप्रमाणेच लैंगिक संबंधांचा उदासीनपणा अधिक टोकाला नेला गेला आहे. प्रणयी स्त्री-पुरुषांच्या प्रेमातला हा भाग तिला ओंगळ वाटतो. सर्वच मित्रांशी ती निर्विषय पातळीवर संबंध ठेवू इच्छिते. तिच्या या मनाच्या लहरीमुळे प्रकाश वारंवार धक्के खातो. निर्विषय स्नेहाचा एक आदर्श पु. यं. नी या कादंबरीत निर्माण केला आहे. प्रकाश व वहिनी यांच्या संबंधात एक आगळी व पवित्र दिशा दाखविली आहे. वस्तुतः हे सर्व संबंध म्हणजे पु. यं. नी पाहिलेली आदर्श संबंधांची स्वप्ने आहेत. ती प्रत्यक्षात असतील नसतील, उतरतील न उतरतील, पण या दिशेने प्रगल्भ व समंजस स्त्री-पुरुष-संबंधाच्या दिशेने वाटचाल केली पहिजे, असा संस्कार ते घडवतात. पुढे रजनीचा लैंगिक संबंधांविषयीचा मानसिक गंड दूर होतो. त्या प्रसंगाचे चित्रणही असेच काल्पनिक पातळीवर केले गेले आहे.

पु. य. देशपांडे यांची नवे जग (१९४१) ही कादंबरी मनोवैज्ञानिक विश्लेषणाच्या दृष्टीने महत्त्वाची असून त्यातील प्रतीक-कल्पना विराट आशय सूचित करते. फॅसिस्ट व समाजवादी जीवनमूल्यांतील संघर्ष तरुलता व अरविंद विरुद्ध विना यांच्या प्रतीकात्मकतेतून यशस्वीपणे चित्रित केला गेला आहे. पण या कादंबरीतही अरविंदला सोडून विनाकडे येण्याचे तरुलतेचे स्वप्न पुरे होत नाही, असे दाखविण्यात पु. य. देशपांडे यांच्या मनातला विवाहासंबंधाच्या पवित्रतेचा संस्कार अधिक प्रबल ठरतो, असे वाटते.

प्रतीकात्मकतेचा वापर विराट किंवा अनेकार्थी आशय सुचविण्यासाठी केला जातो. 'सुकलेले फूल' मध्ये फुले, बाग, नाग इत्यादींचा प्रतीकात्मक उपयोग केला आहे. 'बंधनाच्या पलीकडे' मध्ये जुन्या-नव्या पिढीचा विरोध काहीसा प्रतीकात्मक पद्धतीनेच व्यक्त केला आहे. पण पुष्कळ वेळा प्रतीकात्मकतेतून कृत्रिमपणा येतो. जीवनानुभव फुलविण्यासाठी घटना व व्यक्तिरेखांचा अनेकपदरी वापर करण्याऐवजी लेखक प्रतीकात्मकतेच्या मोहाला बळी पडून विचारांचे निदर्शन मात्र करतो.

आत्मनिष्ठ दृष्टीतून कादंबरीची संरचना करणारा कलावंत सामान्यतः प्रसंगाच्या अकृत्रिम घडणीची काळजी घेत नाही. पु. य. देशपांड्यांच्या कादंबरीतील व्यक्ती कुठेही संयोगाने भेटतात. उदा. 'बंधनापलिकडे'तील प्रभाकर-मैनेची भेट, त्यांचा परिचय व गाढ

ओळख, जाणे-येणे, प्रेम निर्माण होणे या सर्व घटनांतून जो वास्तवाभास व विश्वसनीयता निर्माण व्हायला हवी ती होत नाही. असाच नाटकीपणा 'काळी राणी'च्या पहिल्या रजनी-प्रकाश यांच्या अपघात व मीलनात आहे.

पु. य. देशपांडे पुढे अध्यात्म मार्गाकडे वळले. पण त्याच्या खुणा 'बंधनाच्या पलीकडे' पासून सर्वच कादंबऱ्यांत आढळतात. व्यक्तित्वाच्या विकासाची अनिवार ओढ, व्यक्तिवादी कलादृष्टी, सामाजिकतेचा वैचारिक स्वीकार, परंतु प्रत्यक्ष जीवनाच्या वास्तवाशी अल्पपरिचय, चैतन्याचा वेध घेण्याची तीव्र, उत्कट आकांक्षा आणि समाजवादाच्या मर्यादांची जाणीव या सर्वांचा एकत्र विचार केला की, पु. य. देशपांड्यांच्या विचारांची अंतिम परिणती अध्यात्म मार्गाकडे होणेच तर्कशुद्ध वाटते. कुसुमावती देशपांडे यांच्या मूल्यांकनात फार मोठा अर्थ भरलेला आहे. त्या लिहितात, "त्यांच्या उत्कट आत्मनिष्ठेला तितक्याच कठोर वस्तुनिष्ठेचे अनुशासन लाभले असते, तर मराठी कादंबरीला फार थोर कलावंत लाभला असता.'

पु. य. देशपांडे यांनी जो प्रणयासंबंधी दृष्टिकोन मांडला तो मराठी साहित्यसृष्टीत वेगळा होता. त्यातील संबंधाच्या निर्विषयीपणाचा अतिरेकी आग्रह वजा केला तरी प्रणयाचे आदर्श रूप व स्त्री-पुरुषांच्या संबंधातील मैत्रीचे रूप त्यांनी जे उभे केले ते महत्त्वाचे आहे. माणसाच्या मनाच्या जटिलतेचा वेध घेण्याचा त्यांनी प्रयत्न केला. हा वेध तांत्रिक स्वरूपाचा वा कारागिरांपुरता मर्यादित नव्हता. खराखुरा होता. व्यक्ती व समाज यांतील संबंधाचा व परस्परावलंबनाचा त्यांचा विचार त्या काळात महत्त्वाचा आहे. इतक्या मोठ्या प्रमाणावर कादंबरीत प्रतीकात्मकतेचा समावेश दुसऱ्या कुणी केला नाही.

१९२७ ते १९४४ या काळात सहा कादंबऱ्या प्रकाशित करून नंतर सुमारे १५ वर्षे पु. य. देशपांडे शांत राहिले आणि १९५९ मध्ये त्यांची 'आहुति' कादंबरी मराठीत प्रकाशित झाली. १९५० नंतर काहीशी बहिर्मुखी झालेली आणि सामाजिक/सांस्कृतिक दृष्ट्या तळागाळाच्या माणसाकडे अभिमुख झालेली कादंबरी लिहिली जाऊ लागली. (ही प्रक्रिया सामर्थ्याने 'बळी' कादंबरीने सुरू केली आणि पुढे ग्रामीण साहित्य, दलित साहित्यात जोमदार झाली.) ही प्रक्रिया एकूण साहित्य चर्चेत अधिक प्रखरपणे आल्यामुळे 'आहुती' सारख्या अंतर्मुखी कादंबरीकडे ध्यान जाणे काहीसे कठीण होते. पु. य. देशपांडे यांच्या लेखकीय व्यक्तिमत्त्वात खूप फरक होत होता आणि तो त्या वेळच्या साहित्यिक वातावरणाच्या दृष्टीने काहीसा प्रवाहाविरुद्धही होता. व्यक्तिशः पु. य. देशपांडे यांच्या मनाची घडण लक्षात घेता त्यांनी अधिकाधिक अंतर्मुख व्हावे, आपल्या परंपरांच्या मूल स्रोतांचा शोध घ्यावा व त्यासाठी वैदिक षड्दर्शनांचा अभ्यास करावा, संत वाङ्मयाचे परिशीलन करावे, गौतम बुद्धांच्या तत्त्वज्ञानाचा आणि जीवन जाणिवांचा अधिक मूलग्रामी वेध घ्यावा हे स्वाभाविक होते. कारण त्यांच्या पूर्वीच्या सामाजिक कादंबऱ्यांतूनही ही आध्यात्मिक ओढ जाणवतेच. 'आहुति' च्या प्रस्तावनेत पु. य. देशपांडे एक महत्त्वाचे

निरीक्षण नोंदवतात. "माझा वैचारिक प्रवास, ज्या एका अवस्थेवर आता स्थिरावू पहात आहे, त्या अवस्थेतूनच ही कादंबरी आकारास आली आहे. सामान्यतः मानवाच्या वैचारिक प्रवासाला ना आदि ना अंत. पण उलट सर्व विचारप्रक्रिया पूर्ण स्तब्ध व निःशब्द होण्यातच जीवनाच्या अंतिम अधिष्ठानाचा यथार्थ साक्षात्कार अवलंबून असावा असे मला आता वाटू लागले आहे. या भासाच्या किलकिलत्या प्रकाशात माझ्या गतजीवनातील सर्व अनुभवांची एक अभिनव संगती साकारू पहात आहे. या संगतीच्या काही रूपरेषा म्हणजे ही कादंबरी होय."

या संदर्भात एक महत्त्वाची बाब नोंदवावीशी वाटते. एकूण मराठी कादंबरीला तत्त्वज्ञानाची अनुभवांतर्गत बैठक भक्कम नसून काहीशी ठिसूळ. श्री. वा. म. जोशी यांनी कादंबरीत तत्त्व चर्चा आणली. पण ही तत्त्वचर्चा त्यांच्या पात्रांच्या व्यक्तित्वाच्या गाभ्यातून किती उत्कटपणे स्फुरली आणि एकूण कादंबरीच्या वैचारिक अनुभवांगाला तिने कितपत समृद्ध केले त्याचा विचार व्हायला हवा. पात्रांच्या काव्यशास्त्रविनोदाच्या गप्पा अणि तात्त्विक कादंबरीचे स्वरूप यात अंतर आहे. शिवाय वा. म. जोशी यांची तत्त्वचर्चा ही पात्रांच्या जीवनाला धडका देऊन गती देण्यात कमी आणि बौद्धिक चर्चेच्या स्वरूपाची अधिक. वि. स. खांडेकरांमध्ये तात्त्विक वृत्ती होती; पण त्यांची वृत्ती तत्त्वज्ञानाच्या अभ्यासावर पृष्ट झालेली नव्हती. मराठीत खऱ्याखुऱ्या तत्त्वज्ञ कादंबरीकाराचा निर्देश करायचा असेल तर तो पु. य. देशपांडे यांचाच. त्यांच्या आधीच्या कादंबरीतील तत्त्वचर्चा पात्रांच्या व घटनांच्या प्रतीकात्मकतेतूनही व्यक्त होते. म्हणजे ती कलारूपात मुरून व्यक्त होते. शिवाय पात्रांच्या चर्चेचा स्तर केवळ बौद्धिक न राहता विचारांना बसलेल्या भावनात्मक, संवेदनात्मक आघातातून स्फोटमय रूपाने अभिव्यक्त झाल्याचे जाणवते. आणखी एक महत्त्वाची बाब ही की पु. य. देशपांडे प्रचंड आत्मभान असलेल्या कलावंताप्रमाणे एखाद्या विचाराने, चिंतनशलाकेने किंवा व्यक्तित्व-संकल्पनेने झपाटले जातात. त्यात साक्षात्कारात्मक अनुभवाचे चैतन्य असते. तत्त्वज्ञानात्मक कादंबरीकाराच्या ठिकाणी हे झपाटलेपण आवश्यक असते.

मात्र ज्या काळात १९६० च्या आसपास/नंतर - पु. य. देशपांडे यांच्या तीन कादंबऱ्या प्रकाशित झाल्या, तो काळ वाङ्मयीन दृष्ट्या या अपवादात्मक अनुभवाकडे थवकून पाहाण्याचा नव्हता. म्हणून या कादंबऱ्यांची योग्य ती दखल घेतली गेली नसावी. पण एकूण वाङ्मयीन व्यापाराची समृद्धी अशा वैविध्यातही असते, हे मान्य केले तर पु. य. देशपांड्यांच्या काहीशा आगळ्या आणि अपवादात्मक कृतींची दखल घ्यायला हवी.

'आहुति' कादंबरी कथा, पात्रचित्रण, घटना वा प्रसंगनिर्मिती आणि रसस्थळांची उगवणी या परंपरागत साहित्य-घटकांना दूर सारून जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न करणाऱ्यांच्या बौद्धिक संवादातून विकसित होत जाते. हे संवाद मात्र आंतरिक, बौद्धिक

आवेगातून आणि जिज्ञासेच्या वेगातून निर्माण झालेले आहेत. भारतीय वैदिक आणि षड्दर्शनांची परंपरा पद्धतशीरपणे पाश्चात्त्यांनी खतम करून टाकली. या वस्तुस्थितीतून दोन मित्र भारतीय तत्त्वज्ञानाची चर्चा करतात. यात वैज्ञानिक प्रगती आणि वैदिक विश्वदर्शन यांचे द्वंद्वात्मक अवलोकन आहे. यातून जड अणू परमाणू हे सत्य आणि मन, अहंकार, बुद्धी हे असत्य असं मानण्याला काय आधार आहे? असा मूलगामी प्रश्न निर्माण होतो. यातील नायिकेचं नाव आहुति असलं तरी आहुति ही संकल्पना अनेक जीवन-व्यवहारात, जीवन-चिंतनात शेवटपर्यंत अनेक संदर्भात/रूपात व्यक्त होत राहते. 'आहुति'ची नायिका म्हणा किंवा विद्याधर व त्याचा डॉक्टर मित्र (कथा निवेदक) हेही मानवी स्वभावाचे वेगवेगळे नमुने नाहीत. इथे फक्त वैचारिक संदर्भ आणि संघर्ष वेगळ्या विषयांचा असतो. विद्याधर आणि आहुति यांच्या प्रथम मीलनाचे आणि त्यातील सत्सत्विलक्षण आवेगमय ओढीचे वर्णन पु. य. देशपांडे दार्शनिक शब्दावलीत करतात. मात्र त्याला साक्षात्कारी प्रभावाचे सामर्थ्य असते. पु. य. देशपांडे यांना भाषेचे विलक्षण सामर्थ्य मिळालेले आहे, याचे एक महत्त्वाचे कारण असे की पाश्चात्य परंपरेतील भाषिक मांडणीत भारतीय परंपरेतील विचार/संवेदना पु. य. देशपांडे सहजपणे मांडू शकतात; कारण लेखकाला कुठे तरी परात्पर अस्तित्वाचा अंधुकसा होईना स्पर्श झालेला असावा. त्यामुळे त्यांच्या एकूण भाषिक संरचनेत विलक्षण आत्मप्रतीती आणि जोश आढळतो. विद्या आणि आहुति यांच्या परस्पर दिव्य प्रणयाची ही कथा अशाच आवेगमय साक्षात्कारी भाषेत सांगितली आहे. बाह्य वस्तुस्थिती आणि अंतरिक अस्तित्वावस्था यांचे विवेचन/विश्लेषण करताना पु. य. जी भाषा वापरतात तिच्या संरचनेवर पाश्चात्त्य आणि भारतीय दार्शनिक संकल्पनांचा विशेषतः बौद्ध पारिभाषिक संकल्पनांचा प्रचंड प्रभाव दिसतो. शरीर असून शरीरातीत हा प्रणय सद्सद्विलक्षण असतो! लैंगिक क्रियांचा अभाव असून पुरुषार्थ असतो.

विद्या-आहुति यांच्या दिव्य प्रणयाच्या साक्षात्काराचा अनुभव येऊन बाहेर पडल्यावर कथा-निवेदकाला एक निराधार टाकलेल्या बालिकेची करुण किंकाळी ऐकू येते. निवेदक त्या किंकाळीने विलक्षण प्रभावित होऊन त्या बालिकेला उचलतो आणि विद्याहुतीच्या प्रीतिसंगमाबद्दल एक विलक्षण भेट म्हणून ही संजीवनी घरी आणतो. ज्या औदात्यपूर्ण भाषेत लेखक सर्व वर्णन करतो, त्यातला छोटासा नमुना असा - "आता संघटीत सत्ता-संपत्तीचा निर्बुद्ध मदांधपणा एकीकडे आणि असंघटित व्यक्तींची केविलवाणी असहाय्यता एकीकडे असे एक नवेच द्वंद्व समग्र मानवी जीवनावर साम्राज्य गाजवू लागते आहे. आणि त्यातील विरोध, पतिव्रता व वारयोषिता यांच्यातील विरोधापेक्षा अनंतपटीने अधिक व्यापक व महाभयंकर असा आहे. या संघर्षमय द्वंद्वावर विजय संपादन करता यावा आणि मानवी जीवनाला परम मंगलमय अशी नवी कलाटणी देण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे,

म्हणून परमेश्वरी योगायोगानेच आधुनिक जगाच्या उकिरड्यावर आव्हानकारक आक्रोश करीत असलेली ही संजीवनी मला प्राप्त करून दिली." आध्यात्मिक प्रणयाचा साक्षात्कार-स्वरूप अनुभव देणाऱ्या व्यक्तींनी अभावाने पीडित आक्रोश करणाऱ्या दुनियेकडे आशेने पहावे असा अर्थ या कृतीतून ध्वनित होतो. एकदा लेखकाला अशा भाषेत लिहायची सवय झाली की छोट्या छोट्या बाबींना प्रतीकात्मकता देऊन अर्थव्यंजना करण्याचा हव्यास उत्पन्न होतो आणि जीवनाचा धगधगता स्पर्श अंधुक होऊन काहीशी हास्यास्पदताही निर्माण होते. गंमत अशी की स्वतः लेखकालाही या घटनेतील हास्यास्पदता नंतर जाणवते.

विद्या-आहुति यांच्या प्रणयाचा वेगळा प्रभाव तारावाईंच्या म्हणजे आहुतीच्या आईच्या जीवनावरही होतो. वीस वर्षांचं चैनीचं, भोगाचं, ऐषआरामाचं जीवन सोडून ती एखाद्या गौतम बुद्धाच्या जीवनात आलेल्या परिवर्तनाप्रमाणे वेगळ्या दिशेनं जगू लागते. या तिच्यातल्या परिवर्तनाला कारण झाला होता तो विद्याधर. विद्याधरासारख्या आपल्या मुलाच्या वयाच्या तरुणापासून तिनं हट्टानं दीक्षा घेतली आणि तिचा वेगळा दिशेनं प्रवास सुरू झाला. तिच्या सुखमय जीवनाची 'आहुति' पडते. तशी कादंबरीतल्या सर्वांच्याच जीवनाच्या आहुत्या होमकुंडात पडतात आणि कायाकल्प होतो. तुकारामाच्या अद्‌भुत शब्दसामर्थ्याचा त्यांना जीवनात प्रत्यक्ष अनुभव मिळू लागतो! लेखक लिहितो - "एका अव्यक्त होमकुंडात अनेक अदृश्य आहुत्या एका मागून एक पडत असल्याचा मला भास झाला."

आहुतीच्या जीवन-दिशेला वेगळं वळणं लागल्याची समग्र घटना पत्रकार-नित्यानंद यांनी प्रकाशित केली. इथे एक आगळं पत्रकार व्यक्तित्व साकार झालं आहे. अर्थातच ते नित्यानंद आणि डॉक्टर यांच्या संवादातूनच इथं केलं आहे. नित्यानंद यांनी तारादेवी आणि विद्याधर यांच्यावर आगळाच प्रकाश टाकला आहे. या चर्चेतून भारतीय पुरुषार्थ-संकल्पनांचं भौतिक विवेचन कादंबरीकारानं केलं आहे. नित्यानंदांचं निरीक्षण असंही आहे की हा देश आधुनिक सुशिक्षितांना कळणं शक्य नाही. कारण "आधुनिक सुशिक्षित हे मातृभूजीवनातून मुळापासून उखडलेले व श्रद्धाशून्यतेमुळे सुकून जाऊन निष्प्राण, निस्तेज वनलेले जीव आहेत." तारादेवींच्या संदर्भात झालेल्या चर्चेत नित्यानंद एक महत्त्वाची वाव नोंदवतो - "काळचक्राच्या गाभ्यात चिन्मयशक्तीची जी किमया दडून वसली आहे, तिचा अत्यंत प्रभावशाली उद्रेक दोनच क्षेत्रांत आज दिसून येतो.... राजकारण आणि सिनेमा." या शक्तींचा साक्षात् संवंध जनतेशी आहे. नित्यानंदांची अशी धारणा आहे की "सिनेसृष्टीत अध्यात्मिकतेचे वीज कालानुसार पेंरता आलं तर जी जनशक्ती आज राजकारणाची वटीक बनली आहे, तीच उद्या आत्मजागृत होईल आणि राजकारणावरही तुटून पडण्यात कालांतरानं समर्थ होईल." नित्यानंद मानतात की आपल्या बुद्धीभोवती जडतेचे जे परकोटे उभारले आहेत ते ध्वस्त केले की मूळ चिन्मयशक्तीचा स्फोट होईल. आहुति आणि

तिची आई तारादेवी यांच्या व्यक्तिमत्त्वात हा आमूलाग्र बदल झालेला आहे. असाच दिव्य स्पर्श डॉक्टरांनाही होतो आणि आरंभी असलेला तो असह्य स्पर्शानुभव गीतेच्या श्रवणाने सह्य होऊ लागतो. विद्याधर आणि आहुति यांचा विवाह काशी क्षेत्री होतो. पण हा विवाह म्हणजे एक वेगळी आहुति होती - "आमचा विवाह झाला आणि त्याबरोबर केवळ आमचे देहच नव्हे तर गतकाळातील आमचं सारं संचित विवाहाच्या होमकुंडात टाकलं गेलं. 'मी' आणि 'माझं' अशा दोन आहुत्या विद्याच्या आणि माझ्या होमकुंडात पडल्या." दोघांचंही जीवन भारतीय अध्यात्म आणि संगीत यांच्या साक्षात्कारात आकंठ बुडालेलं असतं. ताराबाई आपली सर्व मिळकत वेदविद्येच्या पुनरुत्थानार्थ केलेल्या ट्रस्टसाठी दान करतात. आहुति टाकताना डॉक्टर पांडुरंग, ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ यांच्या संगतीने आहुति पडेपर्यंत पंढरपुरच्या मार्गाने मार्गक्रमणा करतात.

'आहुति' भारतीय दर्शन आणि आध्यात्मिक जीवनरहाटीचा पुनर्विचार करणारी तत्त्वज्ञानात्मक कादंबरी आहे. पाश्चात्त्य जीवनदर्शन आणि जीवनराहाटी यांचा उबग आलेल्या मनाची ही पुनर्रचना आहे. आज भारतीय जीवनदर्शनाचा प्रभाव चंगळवादी, देहाधिष्ठित, भोगवादी संस्कृतीवर पडताना दिसतो. त्याचा हा वैचारिक मागोवा आहे. याची प्रभावी प्रचिती वाचकांच्या व्यक्तिमत्त्वावर अवलंबून आहे, पण लेखक या जीवनदृष्टीची जी मांडणी करतो ती आधुनिक मनाला समजेल अशा भाषेत करतो. उमजेल किंवा काय हे 'दिव्य' स्पर्शावर अवलंबून आहे.

यानंतर लेखकाने सम्राट अशोकाच्या जीवनावर आधारित कादंबरी 'भेरीघोष की धर्मघोष?' ही १९७२ साली प्रकाशित केली. या कादंबरीच्या हिंदी अनुवादाला हिंदीचे महान लेखक व कादंबरीकार हजारीप्रसाद द्विवेदी यांची छोटी, पण मार्मिक प्रस्तावना लाभली आहे. त्यातील काही उद्घोषच या कादंबरीची शक्ती व सीमा यांवर प्रकाश टाकतात. "ही कादंबरी इतिहासविश्रुत सम्राट अशोकाच्या धर्मविजयावर आधारलेली आहे. हिच्यातील प्रमुख घटना ऐतिहासिक आहेत, या अर्थाने ही कादंबरी ऐतिहासिक मानली जाईल; परंतु ऐतिहासिक कादंबरी हे नाव देण्याने या कादंबरीची पूर्ण ओळख होऊ शकणार नाही. कारण हिच्यात ऐतिहासिक कादंबरीहून किती तरी अधिक असे काही आहे. यात इतिहासाच्या पुनर्व्याख्येचा प्रयास आहे आणि इतिहासाची परंपराबद्ध पक्की, पोलादी चौकट तोडून आणि मानवी जीवनाचे शाश्वत प्रश्न सजीव बनवून ऊर्ध्वमुखी समाधानाकडे वाचकांना घेऊन जाण्याचे सामर्थ्य या कादंबरीत आहे. चैतन्याच्या उमलत्या आवेगाने एक इवलासा तृणांकुर जेव्हा डोके वर काढून उभा राहतो तेव्हा जड जगताची महाकर्षण शक्ती म्हणजेच वैज्ञानिकांच्या भाषेतील गुरुत्वाकर्षणशक्तीदेखील त्याला खाली ओढू शकत नाही. इच्छा शक्ती हा चैतन्याचा धर्म आहे. जडाकडे झुकणाऱ्या चैतन्याच्या मोहाचे प्रतीक आहे - 'भेरीघोष'. तो चैतन्याला अभिभूत करून टाकतो आणि

मग जडता त्याला खाली दडपून टाकते. जडता म्हणजे अपार अंध शक्तीचे आश्रयस्थान. चैतन्यशक्तीही हळूहळू पण निश्चयाने विवेकाच्या दिशेने पावले टाकीत असते. मनुष्यरूपात झालेला चैतन्यविकास हाच वस्तुतः खरा इतिहास आहे.

जडतेच्या शक्तीचा आश्रय घेणाऱ्यांना देशपांडे हे 'शाक्त' या सामान्य नावाने संबोधतात. जालुक याच शक्तीचा आश्रय घेऊ पाहत होता. या कादंबरीत अद्‌भुत शक्तिशाली व्यक्तिचित्रे अवतरली आहेत. त्यातील स्त्रियांची व्यक्तिचित्रे तर विशेषच सामर्थ्यशाली आहेत. देशपांडे यांच्या चिंतन-मननाची झेप पाहून खरोखरच आश्चर्य वाटते. त्यांची तीक्ष्ण दृष्टी प्रत्येक स्तरावरील तत्त्वचिंतनाच्या खोल गुहेत प्रवेश करते आणि त्याचा मर्मभेद करते. अद्‌भुत अशा सहजतेने ते प्रत्येक सिद्धांतामधील चिन्मय अंश मृण्मय अंशापासून विलग करून दाखवतात. हे चिन्मय तत्त्व म्हणजे सहज त्याग, सहज दान, सहज वैराग्य. इतर सर्व गोष्टी म्हणजे या तत्त्वाला आकार देणारे मातीचे साचे आहेत. हे सर्व शक्तिशाली, बुद्धिवैभवसंपन्न पात्रांच्या संवादांच्या माध्यमातून होत असते. म्हणूनच हे एक सामर्थ्यशाली 'बौद्ध' प्रतिपादन आहे, असे म्हणता येईल. या बाबतीत देशपांडे यांना अद्‌भुत यश प्राप्त झाले आहे; परंतु जेथे जेथे घटनांच्या माध्यमातून, केवळ चर्चेतून नव्हे - चित्तत्त्वाचा महिमा घोषित झाला आहे, तेथे तेथे मात्र देशपांडे थेट हृदयाचा ठाव घेतात. कुणालाच्या बहुप्रचलित कथेला त्यांनी याच तऱ्हेने घटनांच्या धावत्या शृंखलेमधून एक नवाच उजाळा दिला आहे. या कथेला त्यांनी एक सर्वस्वी नवीन अशी आगळ्याच प्रकारची कलाटणी दिली आहे आणि मर्मस्पर्शी रूपात हृदयपरिवर्तन मूर्तिमंत उभे केले आहे. येथे सहज त्यागाचे अत्यंत शक्तिशाली साधनाच्या रूपात आपणास प्रत्यक्ष दर्शन घडते..... देशपांडे यांची ही कादंबरी एकीकडे बुद्धीला सारखे धक्के देत राहते; तर दुसरीकडे 'गुहाहिते गव्हरेष्ठे' असे ते त्याला उत्प्रेरित करते. यातील पात्रे ही जडतेच्या आकर्षणाला नव्हे तर चैतन्याच्या उद्‌बोधाला उचंबळवितात. माझ्या मते ही एक श्रेष्ठ व शक्तिशाली कादंबरी आहे. कदाचित अत्याधुनिक मनोवृत्तीच्या लोकांना हिच्यात 'उलटी गंगा' वाहविण्याचा प्रयास दिसेल आणि खरे म्हणजे येथे प्रवाहाला उलटे वळण देण्याचाच प्रयत्न आहे. असाध्य साधना साधण्याचा प्रयास या कादंबरीत आढळतो आणि यात लेखकाला निःसंशय यश मिळाले आहे."

डॉ. हजारीप्रसाद द्विवेदींच्या या सर्व विचारांशी मी सहमत आहे. शिवाय डॉ. हजारीप्रसाद हिंदीमधले महान कादंबरीकार तर आहेतच, पण त्यांच्या कादंबऱ्याही सांस्कृतिक आणि दार्शनिक पृष्ठभूमीवर लिहिल्या गेल्या असून त्यातील अनुभवाला प्रकांड पांडित्याचा रसात्मकतेत मुरलेला परिस स्पर्श आहे. १ ऑगस्ट १९७२ मध्ये मराठीत प्रकाशित झालेल्या कादंबरीच्या हिंदी संस्करणाला लिहिलेल्या प्रस्तावनेवर तारीख आहे. २५-४-१९७२. म्हणजे मराठी संस्करणाआधी हिंदी संस्करण प्रकाशित झाले आणि त्याला एका

महान हिंदी पंडिताने विवेचक प्रस्तावना लिहिली हे आणि एका मराठी कादंबरीकाराचे भरभरून अभिनंदन केले ही घटना मला फार महत्त्वाची वाटते. त्याचबरोबर आम्ही आमच्या लेखकाला ओळखण्यात काही संकोच केला, शैथिल्य दाखवले याची दुःखद जाणीवही होते.

ही कादंबरी ऐतिहासिक म्हणण्यापेक्षा सार्वकालिक आहे असे म्हणावेसे वाटते. यात ऐतिहासिक काळ उभा करण्याचा लेखकाचा हेतू नाही. यात लेखकाला उभे करायचे आहे ते आदिकाळापासून आजपर्यंत चालत आलेले एक मानवी मनाचे द्वंद्व. मानवी जीवनात घडणाऱ्या घटनांच्या पाठीमागची प्रेरकशक्ती शेवटी मानवी मन आहे असे मानले (व पु. य. देशपांडे ते मानतात), तर या मनाचा एक मोठा खेळ देशपांडे यांनी मांडला आहे. हे द्वंद्व ज्या दोन हजार वर्षांपूर्वीच्या घटनेत, एका व्यक्तिमानसात उद्‌भवते त्याची ही मर्मकथा. कलिंग विजयानंतर अशोकाच्या मनात 'भेरीघोष की धर्मघोष?' हे द्वंद्व उभे राहिले आणि त्याने एक प्रचंड किंमत देण्याची तयारी देऊन 'धर्मघोष' महत्त्वाचा मानला. पुढे पंचवीस वर्षे धर्मघोषाचे निनाद ऐकत/ऐकवत त्याने बुद्धधर्माच्या तत्त्वज्ञानाचा/जीवनरहाटीचा प्रसार/प्रचार यशस्वीपणे केला. त्या सर्व प्रवासाचे संदर्भ देत लेखकाने ही कादंबरी लिहिली आहे. उकळत्या तेलात अपराध्याला ढकलून देण्याची शिक्षा फर्मावणारा सम्राट अशोक अपराध्याऐवजी मलाच ढकला, असे सांगणाऱ्या भिक्षू उपगुप्तालाही त्याच्याबरोबर ढकलण्याचा आदेश देतो. अपराधी मरतो, उपगुप्त मात्र आनंदाने तरंगतो. हे पाहाण्यासाठी आलेल्या अशोक सम्राटाला उपगुप्ताच्या पायावर मस्तक ठेवावे लागते आणि या घटनेनंतर एक आगळेच चक्र त्याच्या चित्रात भ्रमण करू लागते. आचार्य उपगुप्ताने पेरलेले बीज पुढे कलिंग युद्धातला नरसंहार बघून पल्लवित, पुष्पित झाले. उलटी गंगा वाहू लागली. या उलट्या गंगेच्या प्रवाहाची कहाणी लेखकाने सांगितली आहे.

पण उलट्या गंगेच्या प्रवाहाला आव्हान देणारी घटना घडते, ती सुमारे पंचवीस वर्षांनी. अशोकाला यवनकन्येपासून झालेल्या पुत्राची-जालुकाची नियुक्ती काश्मीर राज्याचा प्रदेशपती म्हणून केली; तेव्हा त्याचे जन्मरहस्य अशोकाशिवाय कुणालाच माहीत नव्हते. अशोकाच्या धर्मघोषाच्या तत्त्वज्ञानाला रणभेरीच्या तत्त्वज्ञानाच्या बाजूने आव्हान दिले ते जालुकाने. अशोकाने धर्मघोषाच्या तत्त्वचर्चेसाठी बोलाविलेल्या जागतिक संम्मेलनात जालुक विरोध करतो आणि अंतस्थ कारवाया करून विजय मिळविण्याआधीच त्याच्या कारवायांना अशोक आणि तिष्यरक्षिता यशस्वी तोंड देऊन परिषदेत धर्मघोषाच्या तत्त्वज्ञानाचा विजय निश्चित करतात. सर्व कथाभाग लेखकाने अतिशय रोचकपणे रंगवला आहे. अशोकाचा प्रमुख सेनाधिपती राधागुप्तही जालुकाच्या बाजूने उभा राहतो. पण अशोक चातुर्याने त्यांना पराभव पत्करायला लावतो. पुढे जालुकाच्या मनातही परिवर्तन घडते. अशोकाला निद्रानाशाची व्याधी जडते. तिचा मानसशास्त्रीय मागोवा घेऊन तिष्यरक्षितेकरवी ती

व्याधी नष्ट केली जाते. तिष्यरक्षिता आणि अशोकपुत्र कुणाल यांच्या पवित्र मैत्रीचे अतिशय निर्मळ चित्र रेखाटले गेले आहे. तिष्यरक्षितेच्या वासनाशून्य पण मधुर जीवनलीलेचे मोठे मर्मस्पर्शी चित्रणही येथे केलेले दिसते. अशोक आणि तिष्यरक्षिता यांच्यातील प्रव्रजारूप विवाहाचाही प्रभावी चित्रमय निर्देश केला आहे. कुणालच्या अतिसुंदर डोळ्यांचे आणि चक्षुदानाच्या आहुतीचे मोठे रसात्मक वर्णन केले गेलेले दिसते. जालुक आणि त्याची शाक्तपंथी सुंदर पत्नी ईशानदेवी यांच्या परस्पर संबंधातल्या उत्कट प्रेमाचे चित्रण मोठे रसात्मक आहे. पुढे शाक्तपंथ आणि बौद्धमत यांतील संघर्षात बौद्ध मत विजयाचे वर्णन आहे. कुणालच्या चक्षुदान प्रसंगातून खूपच नाट्यात्मक प्रसंग उद्‌भवले आहेत. या कादंबरीत लेखकाची नाट्यमय प्रसंगनिर्मितीची कला अधिक वरचढ झाल्याचाही अनुभव मिळतो. कुणालच्या चक्षुदानाने ईशानदेवी आणि जालुक यांचे हृदयपरिवर्तन होते आणि ते तथागतदेशनाचा स्वीकार करतात. तिष्यरक्षिता तर कुणालचे डोळे पूर्ववत व्हावेत म्हणून सौंदर्य-विहाराला लागलेल्या आगीत जीवनदान देते आणि तिचे ईप्सित पूर्ण होते. 'कुणालचे डोळे पूर्ववत् चिन्मय सौंदर्याने विलसू लागले' आणि जालुक व ईशानदेवी यांच्याही डोळ्यातून अश्रूंचे पूर लोटू लागले. त्यांची श्रद्धा बौद्ध श्रद्धेने संपूर्णपणे विलोपून गेली.' ही सर्वच कथा अपूर्व जीवनदानाच्या माहात्म्याने उदात्तेचा गहन संस्कार करणारी झाली आहे. मानवमात्र तथागताच्या दिशेने वाटचाल करू लागेपर्यंत-धर्मजीवनाची राणीव जगात प्रस्थापित होईपर्यंत ज्या घटना घडतील त्यातली ही एक 'कोणे एके काळी घडलेली घटना'-

या कादंबरीत बौद्धदेशनेच्या अनेक पारिभाषिक शब्दांना उजाळा दिला आहे. नवेअर्थही दिले आहेत.

ही कादंबरी वाचताना मनात सतत एक प्रश्न येत राहतो. आज बुद्धाच्या जीवनाची, कार्याची आणि तत्त्वज्ञानाची जी उभारणी होत आहे, त्याच्या मुळाशी या मूळ विशुद्ध संकल्पनांची जाणीव आहे, की सर्वच धर्मांचा पुढे जसा उपयोग केला जातो, तशीच अवस्था बौद्ध धर्माचीही झाली आहे? हा एक मोठा प्रश्न मनात उभा करण्याचे फार महत्त्वाचे आणि मोठे कार्य पु. य. देशपांडे करतात. आम्ही रणभेरीच्या मार्गाने जात आहोत की धर्मघोषाच्या? हा प्रश्न तीव्रतेने मनात उभे करण्याची आजच्या क्षणी मोठी आवश्यकता आहे. धर्माच्या विशुद्ध स्वरूपाची राणीव निर्माण करण्याची आवश्यकता आहे आणि ती समर्थपणे पु. य. देशपांडे यांनी केली आहे. कदाचित भारतीय भाषांतल्या साहित्यात हा प्रश्न प्रथम समर्थपणे पु. य. देशपांडे यांनी उभा केला आहे.

यानंतर १९७८ मध्ये पु. य. देशपांडे यांची छोटी पण मूल्यवान अशी 'आमूलाग्र' कादंबरी प्रकाशित झाली. पु. य. देशपांडे यांना एखाद्या कलाकृतीचं पूर्वसूचन कसं मिळतं, त्यात अंतर्मनाची किती क्रीडा असते याचं उदाहरण या कादंबरीच्या बीज कल्पनेत सापडते. त्यांना या कादंबरीचं बीज मिळालं ते विलक्षण स्वप्नात. ते लिहितात - "या

विलक्षण स्वप्नाच्या निगूढ आशयाने मला इतके भारावून टाकले की काय, वाक्, चित्त व ज्ञान या चार प्राकृतिक अंगांनी युक्त होऊन जन्मास येणाऱ्या स्त्री-पुरुषात एक 'आमूलाग्र' क्रांती घडून येणे कसे संभवनीय आहे, याचा जणू साक्षात्कारच या विलक्षण स्वप्नाने मला घडवला. या 'स्वप्नां'तील कथाबीजाचा विकास म्हणजेच ही कादंबरी."

खरं म्हणजे हे 'स्वप्न' तसं आकस्मिक नव्हतं. पु. य. देशपांडे यांनी अनेक वर्षे बौद्ध तत्त्वज्ञानाचा जो विलक्षण व्यासंग केला त्या व्यासंगातून झालेल्या मननांतून, चिंतनातून हे स्वप्न आकारित झालं होतं. पु. य. देशपांडे यांचा बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास केवळ भारतीय समाजव्यवस्थेतील विशिष्ट सामाजिक/धार्मिक दोषांचं परिमार्जन करण्याच्या दृष्टीने झालेला नव्हता. तो सम्यक् जीवनाचा समग्रलक्षी अभ्यास होता. बौद्ध तत्त्वज्ञानात ज्या पारिभाषिक संज्ञा आल्या आहेत त्यांचा प्रचंड प्रज्ञेच्या प्रकाशात जो चिंतनात्मक अर्थ त्यांना उमजला होता तो त्यांच्या कलावंताने जीवन-स्पंदनांनी, संवेदना-भावनांनी युक्त अशा अनुभवांतील विलक्षण कलात्मक (परंतु विकट परिश्रमानंतर प्राप्त होणाऱ्या सहजतेतून आकारित) रूपबंधातून मांडला. यात त्यांनी प्रास्ताविक निवेदनात म्हटल्याप्रमाणे सर्व मानसशास्त्रीय सिद्धांत लटके पडून गेले आहेत. कारण या कादंबरीतल्या तीन प्रमुख व्यक्तिरेखा एका बाजूने विलक्षण बुद्धिमान तर दुसऱ्या बाजूने मानसिक रोगांनी काही काळपर्यंत पछाडलेल्या. त्यांचे मानसिक रोगही मानसिक-आत्मिक स्वरूपाचे आणि त्यांचे पुनः निरोगी होणेही त्यांच्यातल्याच प्रचंड आत्मबलातून शक्य झालेले. त्यांच्याच भाषेत सांगायचे तर 'काय, वाक्, चित्त व ज्ञान या चार प्राकृतिक अंगांनी युक्त होऊन जन्मास येणाऱ्या स्त्री-पुरुषांत एक आमूलाग्र क्रांती घडून येणे कसे संभवनीय आहे' याचा जणू 'साक्षात्कार' ही कादंबरी ताकदीने घडवते.

अनीतेवर बलात्कार करतो तिचाच प्रियकर आणि त्यामुळे तिच्या मानसिक आघातातून तिचे मनच बदलते असे नव्हे तर तिचा गौर वर्ण रात्रीत कृष्ण वर्ण होतो. गौरीवर बलात्कार करतो एक तरुण मित्र, जो तिला प्रियकर म्हणून नको असतो. पण आश्चर्य हे की तो बलात्कार तिलाच आवडला आणि त्यातून कोणत्याही आवडलेल्या पुरुषाशी संभोग करण्याचा आणि लगेच विसरून जाण्याचा मानसिक रोग तिला होतो. पारंपरिक वैद्यकशास्त्राप्रमाणे या दोघींचे रोग असाध्य. म्हणून केवळ असाध्य रोगावरच उपचार करून रोग्यांना बरे करण्याचे व्रत घेतलेल्या डॉक्टर विश्वनाथांशी या दोघींचा संबंध येतो. काही काळ डॉक्टर विश्वनाथही अहंकार रोगाने ग्रस्त होतो. म्हणजे तोही काहीसा रोगग्रस्तच होतो. या तिघांच्या परस्पर संबंधातून तिघांचेही मानसिक रोग बरे होतात. गौरी अनीताला लिहिलेल्या पत्रात सांगते - "बुद्धवाणीने विश्वनाथांचा आत्मदीप चेतवला. विश्वनाथांनी तुझ्यात आत्मदीप चेतवला. तू माझा आत्मदीप चेतवलास आणि माझ्या माध्यमातून कदाचित तशाच प्रकारे काही आत्मदीप चेतवले जातील आणि मग त्यांच्या

माध्यमातून असंख्य इतर आत्मदीप चेतवले जातील. हीच कल्याणमय जगत्क्रांतीची खरी प्रक्रिया आहे." - भगवान बुद्ध, येशू ख्रिस्त, महंमद पैगंबर, महात्मा गांधी यांची प्रक्रिया तशी व्यक्ति-मनाचे आत्मदीप प्रकाशित करण्याची होती आणि त्याचे पुढे प्रचंड समाज-मनाच्या स्पंदनात रूपांतर झाले, हा इतिहास नाकारता येणे शक्य नाही. या अर्थाने ही कादंबरी व्यक्तिकेंद्रित असली तरी समष्टी-मनाला आवाक्यात आणणारी आहे.

या कादंबरीत घटना व व्यक्ती चिंतन-प्रवाहाच्या खुंट्या असल्या (तीन प्रमुख व्यक्तींना स्वतंत्र व्यक्तित्वे मिळाली आहेत) तरी पु. य. देशपांड्यांचा कलावंतही अतिशय सूक्ष्मपणे आपल्या वैचारिक/चिंतनपर अनुभवाची कलात्मक मांडणी करतो आणि त्यात दर्जेदार नाट्यात्मक तत्त्वही अनुस्यूत आहे.

ही कादंबरी प्रचलित मानसशास्त्रीय सिद्धांतांना धक्के देत प्राचीन बौद्धमताची उभारणी ज्या सुदृढ मानसप्रक्रियेवर झालेली आहे त्या करुणा, प्रीती वा प्रणिधान, अहंकारशून्यता यांचा आधार घेते. प्रकृती आणि संस्कृती यांचा सुमेळ, काय-वाक्-चित्त व ज्ञान यांचा आदर्श संबंध, अतीत आणि भविष्य यांच्याकडे पाहण्याची वर्तमानकेंद्रित जीवनदृष्टी, दुःख आणि निर्वाण, गतानुगतिकता आणि नित्यनूतन निर्मितिक्षमता, स्त्री-पुरुष संबंधातील निरागसता, संभोग काय, धर्म काय आणि सहज काय, निर्माण काय यांच्या उत्तरोत्तर उत्क्रांत अवस्था अशा जीवनविषयक महत्त्वाच्या संकल्पनांचं सखोल आणि जीवनानुभवानं चिन्मय झालेलं चिंतन या कलाकृतीत सहजपणे प्रकाशित होत जातं. आधुनिक जीवनातील विध्वंसात्मक मूल्यव्यवस्थेवर आणि तज्जन्य संकटावस्थेवर ही कादंबरी विलक्षण शक्तिशाली भाष्य करते. मराठीतल्या चिंतनशील कादंबऱ्यांचा 'शिरोमणी' ठरावी अशी ही महत्त्वाची तत्त्वज्ञानात्मक कादंबरी.

या संदर्भात पु. य. देशपांडे यांच्या चिंतन सामर्थ्याबद्दल एक महत्त्वाची बाब आवर्जून नोंदवावीशी वाटते. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातील संकल्पना पूर्णपणे पचवून भारतीय संकल्पनांचा स्वयंप्रज्ञेने मौलिक चिंतन करणारा पहिला भारतीय तत्त्वज्ञ कादंबरीकार असे निःसंदिग्धपणे पु. य. देशपांडे यांच्या संदर्भात म्हणता येईल. बौद्ध तत्त्वज्ञानातील मूलभूत तात्त्विक संकल्पनांची ही भक्कम बैठक बौद्धधम्माचा समग्र विचार करताना दुर्लक्षून चालणार नाही. पु. य. देशपांडे यांनी कादंबरी लेखनाबाबत स्वीकारलेले २०/२५ वर्षांचे मौन हे सर्जनात्मक मौन होते आणि त्या मौनातून भारतीय तत्त्वज्ञानाच्या वृक्षाचा अंकुर जोमाने जडतेविरुद्ध टक्कर देत वाढत होता. त्यांचे तात्त्विक विश्लेषण आजच्या क्षणी कालसंगत व अर्थपूर्ण होत चाललेले आहे. त्याचा संदर्भ भारत तर आहेच, पण अखिल विश्वही आहे.

एफ/१८, कल्पनामती हौसिंग सोसायटी,
औंध रस्ता, पुणे - ७ फोन - ५८८७९२७



○

# माझ्या साहित्याच्या प्रेरणा

○

## - डॉ. द. न. गोखले

*('दि. २७ मे २००० या दिवशी, शनिवारी महाराष्ट्र साहित्य-परिषदेने आपला ९४ वा वर्धापन दिन साजरा केला. पुण्याला स. प. महाविद्यालयात सायंकाळी ६ वाजता हा समारंभ संपन्न झाला. त्या वेळी 'प्रदीर्घ आणि दर्जेदार' वाङ्मयसेवेबद्दल दिले जाणारे 'महाराष्ट्र-साहित्य-परिषद-पारितोषिक' डॉ. द. न. गोखले या सुप्रसिद्ध, ज्येष्ठ साहित्यिकांना देण्यात आले. यावेळी डॉ. गोखले यांनी जे निवेदन केले, त्यावर आधारलेला, पण थोडासा परिष्कृत असा पुढील लेख आहे. हे त्यांचे जाहीर असे शेवटचेच भाषण. यानंतर २७ जून २००० रोजी त्यांचे निधन झाले.)*

माझी फक्त १४ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. पैकी बरीचशी चरित्रात्मक असल्यामुळे काही जणांची अशी समजूत झाली आहे की थोरांच्या चरित्राचे अनुकरण व्हावे म्हणून मी ही पुस्तके लिहिलेली आहेत. पण लोकांना बोधामृत पाजावे असा माझा केव्हाही उद्देश नव्हता.

मुख्यतः काही कर्तृत्व साहित्यिक क्षेत्रात करावे या प्रेरणेने मी लेखन केले. तेव्हा मी सांगलीला होतो आणि तेथेच आपल्या अंतिम आजारात, हवापालटासाठी क्रांतिवीर बाबाराव सावरकर हेही आलेले होते. त्यांच्या शुश्रूषेसाठी स्वयंसेवक म्हणून जे तरुण जात असत, त्यांत मी एक होतो. काय योग जमला देव जाणे, पण बाबारावांशी माझा घनिष्ठ संबंध जडला आणि त्यांनी सगळे आत्मचरित्र मला ऐकवले! तत्कालीन क्रांतिकारकांचा इतिहासही त्यांच्या तोंडून मला ऐकावयास मिळाला! आत्मचरित्र आणि हा इतिहास मी रोजच्या रोज लिहून ठेवत होतो. मला असे आढळले, की त्यात पावलोपावली अज्ञात घटना होत्या आणि त्या साऱ्याच रोमहर्षक नि प्रकाशदायक होत्या. तेव्हा मी महाराष्ट्रभर प्रवास केला आणि पूरक माहिती कागदपत्रे, आठवणी, हकीकती यांच्या स्वरूपात जमा केली. हे सारे अज्ञाताच्या गुहागुंफेत विरून जावे असे मला वाटले नाही. ते लोकांसमोर आणण्याचे कर्तृत्व आपणच करावे, अशी प्रेरणा मला झाली. त्यामुळे 'क्रांतिवीर बाबाराव सावरकर' हे चरित्र लिहिले गेले. माझे कर्तृत्व पूर्ण फलास आले, अशी पावतीही मला एका प्रसंगी मिळाली, तो प्रसंग असा -

'क्रांतिवीर बाबाराव सावरकर' हे पुस्तक १९४७ साली फेब्रुवारीमध्ये प्रसिद्ध झाले.

त्यानंतर अनेक वर्षांनी एके दिवशी डॉ. य. दि. फडके माझ्या पुण्याच्या घरी अचानकपणे आले. तेव्हा त्यांचे 'सावरकरांचा शोध' हे पुस्तक छापले जात होते. ते म्हणाले, "तुमचे आभार मानण्यासाठी मी आलो आहे. माझ्या पुस्तकासाठी वगैरे मी काही संशोधन केले, काही सरकारी कागदपत्रे बघितली, पण तुमच्या पुस्तकातील माहिती मला दुसऱ्या कुठेही मिळाली नाही." हे ऐकून मला अर्थातच फार आनंद झाला. बोलता बोलता मी त्यांना विचारले, "माझी माहिती तुम्हाला कोठे चुकीची आढळली का? विकृत वाटली का? अतिरंजित दिसली का?" त्यावर माझी एक किरकोळ चूक सांगितली. पण माहिती कुठेही दूषित नसल्याचा निर्वाळा दिला. लिहिताना तो तो प्रसंग वाचकांच्या मनावर ठसावा, माझ्या मनात ज्या भावना उचंबळल्या त्या त्यांच्याही मनात उचंबळाव्या म्हणून मी त्या धर्तीचे लेखन केले आहे, पण काटेकोर सत्यकथन हा बाबारावांच्याच थोरवीचा भाग होय. नाही तर तेव्हा, सरकारी कागदपत्रे उपलब्ध नसताना आणि क्रांतिकारकांच्या सर्वच हालचाली गुप्त असताना त्यांनी जरी काहीही सांगितले असते तरी खरे ठरून जाण्याचा संभव होता.

माझ्या पीएच. डी. च्या प्रबंधासाठी मी ज्ञानकोशकार डॉ. केतकरांचा अभ्यास करून केलेला होता. त्यांचे चरित्र, त्यांचे व्यक्तित्व आणि त्यांचे समग्र लेखन मी विश्लेषक पद्धतीने पुनःपुन्हा बघितले होते. त्यांनी ज्ञानासाठी केलेला प्रचंड खटाटोप मी बघितला होता. तो सामान्य लोकांपर्यंत पोहोचविण्याची आपण पराकाष्ठा केली पाहिजे, अशी आकांक्षा माझ्या मनात वावरत होती. त्यासाठी डॉ. केतकरांचे एक संश्लेषक, लोकप्रिय चरित्र लिहावे असे मला वाटत होते. माझ्या मनातील कर्तृत्वाची ही खुमखुमी 'डॉ. केतकरां'च्या चरित्राच्या रूपाने शब्दबद्ध झाली. ज्यावेळी राज्य शासनानेच नव्हे तर साहित्य अकादमीचेही पारितोषिक मला मिळाले. तेव्हा माझ्या कर्तृत्वाचे सार्थक झाले. केतकरांचे सारे कर्तृत्व एका विचित्र व्यक्तित्वाशी निगडित झालेले होते. मी तेही पुस्तकात दाखविले आहे. चरित्र आणि व्यक्तित्व यांचा संबंध किती गुंतागुंतीचा असतो हे दाखविण्याचा माझा त्यात प्रयत्न होता.

पण कर्तृत्व हीच काही माझी एकमेव प्रेरणा नव्हती. कर्तृत्वाबरोबर 'कर्तव्य'ही होते. बाबारावांनी दहा वर्षे अंदमान भोगले, त्यानंतर कित्येक महिने त्यांना विजापूरच्या एका अंधार कोठडीत ठेवण्यात आले, ती अंधार कोठडीही पचवली. अंदमानापूर्वी त्यांना विजेचे झटके दिले गेले, तेही त्यांनी प्राणपणाने गिळले. त्यांच्या असल्या हालांची आणि इतर उद्योगांनी मी अक्षरशः भारावून गेलो होतो. रोमांच्यांनी पुनःपुन्हा हेलावलो होतो. तेव्हा, हे सर्व उसासे, सुस्कारे आणि हालअपेष्टा अंधारात विरून जाव्यात का? त्या लोकांसमोर आणणे माझे कर्तव्य नाही का? असे मला वाटत होते. तेव्हा कर्तव्यभावननेही सावरक चरित्राचे लेखन माझ्याकडून झाले.

गांधीजी एक महामानव होते, हे सर्वांना माहीत होते. ते महारोग्यांची शुश्रूषा करीत, हे सर्वज्ञात होते. पण ते सांगण्यासाठी मी गांधीजी लिहिले नाही. माझ्यासारख्या एखाद्या बुद्धिवादी, राष्ट्रवादी आणि सावरकरवादी माणसाचे विचार गांधीजींच्या विचाराशी सतत कसे टकरत होते हे सांगणे मला माझे कर्तव्य वाटले. त्या कर्तव्य भावनेने मी गांधीजी लिहिले.

कर्तृत्व नि कर्तव्य या दोन प्रेरणा माझ्या साहित्यकृतींच्या मागे नव्हत्या; त्यांच्या मागेच कौशल्याची तिसरी एक प्रेरणा होती. 'योगः कर्मसु कौशलम्' असे गीतेत म्हटले आहे. त्याप्रमाणे माझ्या कर्तृत्वाला व कर्तव्याला मी कौशल्याची जोड देत होतो. निर्मितिदृष्ट्या हे फार महत्त्वाचे आहे. कर्तृत्वात किंवा कर्तव्यात कौशल्य कुठे येते ते 'माधव जूलियन' आणि 'स्वातंत्र्यवीर सावरकर' यांच्यावरील पुस्तकांच्या उदाहरणांनी सांगता येईल.

माधव जूलियन यांचे अनेक स्त्रियांवर प्रेम होते. त्यातील शांताबाई, वरदा आणि लीलाताई या प्रसिद्ध आहेत. एकीच्यावर त्यांनी कुमारवयात प्रेम केले, दुसरीवर तारुण्यात प्रेम केले आणि तिसरीवर प्रौढपणी प्रेम केले, हे सर्वज्ञात आहे. 'प्रेम' या एकाच ढगळ शब्दांत तिघींविषयी भावना कोंबण्याची लोकरीती आहे. 'योगः कर्मसु कौशलम्' म्हणजे या तिन्ही भावनांचे स्वरूप कसकसे वेगळे होते आणि तिघींवरील प्रेम म्हटले तरी ते किती वेगवेगळे होते, हे सांगणे होय. मी प्रत्यक्ष जीवनातील प्रसंग उभे करून ते दाखविण्याचा प्रयत्न केला आहे आणि माझे कौशल्य तेथे वाचकांना थोडेफार दिसू शकेल.

सावरकरांनी दोन जन्मठेपी झेलल्या, दहा वर्षे अंदमान सोसले, हे सर्वांना माहीत आहे. त्यांनी अंदमानातच 'कमला' हे कुसुमकोमल, हळुवार काव्य लिहिले; हेही प्रसिद्ध आहे. अंदमान आणि कमला ही परस्परविरोधी दोन टोके सांधल्याबद्दल सावरकरांचे भरपूर कौतुकही होते. पण 'योगः कर्मसु कौशलम्'ने मला सावरकरांच्या अंतरंगात नेले. अंतरंगात खोल खोल शिरून त्याचा ठाव काढण्याचा मी प्रयत्न केला. यातनांचे वज्रप्रहार त्याच्यावर सतत होत होते; पण हा हिरा भंगला नाही. इंग्लंडमधून हिंदुस्थानात आणताना मोरिया बोटीवर त्यांना एका बंदिस्त कोठडीत कोंडले होते. बाहेर भयंकर उन्हाळा होता. या कोठडीत आपणाला तडफडून मरावे लागेल की काय, असे त्यांना वाटत होते. पण अभेद्य विचारांची एक संरक्षक भिंत त्यांच्या मनात उभी राहिली.

'अनादि मी । अनंत मी । अवध्य मी भला । मारिल रिपु । कवण असा जगति जन्मला?' ही कविता त्यांनी तेथे रचली! अंदमानात जात असता बोटीवर शौचाच्या जागेपाशी त्यांना आपली पथारी घालावी लागली. भयंकर दुर्गंधी येत होती. झोपेचे नाव नव्हते. पण त्रैलिंग स्वामींचे स्मरण तेथे त्यांनी केले, हे स्वामी समदृष्टीचे होते. न्यायाधीशांनी

त्यांना विचारले, 'तुम्ही समदृष्टीचे आहात, तर स्वतःची विष्ठा खाल का?' भर न्यायालयात त्यांनी विष्ठा खाऊन दाखवली! या प्रकारे त्रैलिंग स्वामींच्या स्मरणाने सावरकरांना ती वेळ निभावता आली. सावरकर एका अर्थी रोमँटिक होते. त्यांनी आपला रोमँटिसिझम अंदमानच्या हालअपेष्टांविरुद्ध उभा केला आणि ते पार पडले. 'मूर्ति दुजी ती' या कवितेत त्यांनी कवितेच्याच दुजा मूर्तीला आवाहन करताना म्हटले आहे

"मारक जे । दुःसह जे । कठीण कटू कडू
तेच आज आरोग्यद"

जे मारक असेल, सहन करण्यास कठीण असेल, जे टणक असेल नि अतिशय कडू असेल तेच आज मला आरोग्य, सहनशक्ती देईल. या कोवळ्या कवीने मारकाची उपासना केली. तोच त्यांचा कवच-मंत्र ठरला. त्यांनी अंदमानातले भयानक छळ नि हाल या कवच-मंत्रावर झेलले. 'योगः कर्मसु कौशलम्' हे गीतावचन माझ्या असे उपयोगी पडले.

कर्तृत्व, कर्तव्य आणि कौशल्य या तीन माझ्या प्रेरणा असल्या तरी सर्व साहित्याची निर्मिती मी नेकीने केली आहे. माधव जूलियन यांनी 'गज्जलांजली' च्या प्रारंभी म्हटले आहे, "केली झाली तशी कलेची सेवा काहीही म्हणा परि स्मरोनी नेकी" तसेच मी म्हणेन. फक्त मी "केलेली सेवा" केलेली नाही; त्याऐवजी शब्दांची निर्मिती करून साहित्य जन्मास घातले.

"केली झाली तशी निर्मिली शब्दी
काहीही म्हणा परि स्मरोनि नेकी"

शब्दांकन - सौ. कल्पना गोखले



दि. ६-११-२००० हा ख्यातनाम मराठी समीक्षक श्री. के. क्षीरसागर यांचा जन्मशताब्दि-दिन. साहित्यपरिषदेने तो साजरा केला. त्या दिवशी सायंकाळी प्रा. डॉ. व. दि. कुळकर्णी यांचे 'श्री. के. क्षी. : जीवन आणि कार्य' या विषयावर भाषण झाले. भाषणाच्या शेवटी श्रीं. के.क्षी. यांचे एक छोटे ध्वनिमुद्रित भाषण ऐकविण्यात आले.

O

# ही तों कृतज्ञतेची वचने । स्वीकारा जी

O

## शं. गो. साठे गेले !

O

- प्रा. माधव वझे

साठ्यांचा जन्म ११.३.१९१२ रोजी पुण्यात झाला. देहावसान झाले २४.१२.२००० रोजी, तेही पुण्यातच! त्याआधी काही महिन्यांपूर्वीच त्यांच्या मोजकेच, पण दर्जेदार कादंबरी-लेखन केलेल्या सुविद्य पत्नी सुधाताई जोशी यांचे निधन झाले होते. पुण्याला विश्रामबागवाड्याकडून मंडईकडे जाताना डाव्या हाताच्या वळणावर साठ्यांचा वडिलोपार्जित वाडा होता. तिथेच ते राहिले आणि लेखनही तिथेच केले. मृत्यूसमयी ते पौड रस्त्यावरील त्यांचे पुत्र श्रीनिवास व सून यशोधरा यांच्या सदनिकेत वास्तव्यास होते.

१९३८ साली साठ्यांनी 'छापील संसार' हे नाटक लिहिले: पण साठ्यांचा खरा पिंड कवीचा, किंवा त्यानंतर इतर ललितलेखनाचा. त्यानंतर त्यांनी दोन खंडकाव्ये लिहिली. ('तो आणि ती' - १९४१ आणि 'शिलंगण' - १९४२) 'चिंचा आणि बोरे' हा स्फुट विनोदी कवितांचा संग्रह १९४५ साली प्रसिद्ध केला. १९४७ साली 'औट घटकेचे राज्य' ही कादंबरी लिहिली. १९५५ साली 'झुंज' ही कादंबरी लिहिली. दरम्यान १९५४ साली त्यांनी 'मऱ्हाठीचिये नगरी' हा एकांकिकांचा संग्रह प्रसिद्ध केला. त्यानंतर त्यांना स्वतःची नस गवसली की काय कुणास ठाऊक, त्यांनी जे केले ते फक्त नाट्यलेखन.

'स्वप्नीचे हे धन' (१९५९), 'पहाटेची चाहूल' (१९६०), 'ससा आणि कासव' (१९६४), 'धन्य मी कृतार्थ मी' (१९६५) अशी गाजलेली नाटके त्यांनी लिहिली आणि मराठी नाट्यलेखनाशी त्यांच्या नावाचे समीकरण झाले.

महाराष्ट्रभर गावोगावी विखुरलेल्या हौशी नाट्यसंस्था, राज्य नाट्य महोत्सवाच्या निमित्ताने १९५५, एकमेकींसमोर आल्या, ही घटना मराठी रंगभूमीच्या दृष्टीने, महत्त्वाची ठरली आहे. नाट्य महोत्सवामध्ये आपापल्या नाट्यप्रयोगांना उतरविणाऱ्या त्या संस्थांच्या लेखी त्या वेळी तरी तो एक केवळ उत्सव होता. आपापले नाट्यप्रयोग सरकारी खर्चाने सादर करण्याची संधी मिळाली आणि पहिल्या फेरीतून आपला नाट्यप्रयोग अंतिम फेरीसाठी गेल्यामुळे, इतर नाट्यसंस्था नाटकांचा व नाट्यप्रयोगांबद्दलचा काय विचार करीत आहेत, ते समजून घेता आले, असे माफक समाधान मिळवून, संस्था राज्य नाट्य

महोत्सवात भाग घेत होत्या. त्यामध्ये पुणे, मुंबईचे हौशी कलाकार होते, त्याचबरोबर अकोला, अमरावती, बेळगाव, लातूर असे कुठून कुठून कलाकार अगदी वारकरी मंडळींच्या निष्ठेने, स्पर्धांमध्ये नाट्यप्रयोग घेऊन येत होते.

मनोरंजन आणि शिक्षण असे रंगभूमीचे जोड प्रयोजन आहे, असे तोपर्यंत ठरूनच गेले होते. त्या प्रकारच्या रंगभूमीचा ज्यांच्यावर असर होता, ते ऐतिहासिक-पौराणिक नाटकांचे प्रयोग करीत होते आणि सामाजिक नाटक वरेरकर-अत्रे आणि फार तर रांगणेकर यांच्या अवतीभवतीच फेऱ्या मारीत राहिले होते. काही वर्षांनंतर बाळ कोल्हटकर व मधुसूदन कालेलकर यांचे स्वतंत्र, सोज्वळ, सामाजिक व कौटुंबिक नाटक आले आणि उसना इब्सेन परवडला, पण हे 'मेलो मेलो' म्हणणारे स्वतंत्र कौटुंबिक मेलोड्रॅमॅटिक नाटक नको अशी परिस्थिती निर्माण झाली.

त्या वेळी आपल्या हौशी रंगभूमीला तेंडूलकर माहीत झाले. 'माणूस नावाचे बेट', 'मधल्या भिंती' या त्यांच्या नाटकांच्या केवळ शीर्षकांनीच, मराठी रंगभूमीवर आधुनिक जाणिवा येत असल्याचे स्पष्ट केले. वसंत कानेटकरांचे 'वेड्यांचं घर उन्हात' आले आणि पंचेंद्रियांच्या आवाक्यात न येणारे असे काही एक आंतरिक वास्तव असते, हे आपल्या रंगभूमीला उशिराने का होईना, पण लख्खपणे कळून आले. व्यंकटेश माडगूळकरांचे 'तू वेडा कुंभार' आले आणि यंत्रयुगाच्या आगमनाबरोबर होऊ पहाणारी पडझड स्वच्छपणे नजरेसमोर आली. 'या भवनातील गीत पुराणे मवाळ हळवे सूर जाऊ द्यात' असे एकंदर वातावरण होते. आता, त्या वातावरणात गो. नी. दांडेकर व पुरुषोत्तम दारव्हेकर होते, ही वेगळी गोष्ट.

मराठी रंगभूमीवर आधुनिक जाणिवांचे दर्शन व्हावे असा प्रयत्न नाटककार प्रा. शंकर गोविंद साठे यांनीही सातत्याने केला. 'स्वप्नींचे हे धन' हे त्यांचे नाटक पुण्याच्या 'महाराष्ट्रीय कलोपासक' या संस्थेने प्रथम रंगमंचावर आणले, १९५७ मध्ये, राज्य नाट्य महोत्सवात. एका विशिष्ट परिस्थितीमध्ये नोकरी पत्करून, ती सतत वीस वर्षे करीत आलेल्या आणि आता चांगल्या हुद्यावर असणाऱ्या गृहस्थाने, स्वेच्छा निवृत्ती घ्यायची ठरविले आहे. त्याला त्याचे 'मूळचे रूप' पहायचे आहे. पण भोवती इतकी अडगळ जमली आहे, की ती दूर केल्याखेरीज ते रूप त्याला दिसणार नाही. ती अडगळ आहे, संसारात जमविलेल्या बारीकसारीक वस्तूंची. त्या वस्तूंचे एक कुंपणच त्याने स्वतःभोवती उभे केले आहे. म्हणून तो आता मोकळा होऊ पहात आहे. नेमक्या त्याच वेळी आणखी एक महत्त्वाचे पद, त्याचे कार्यालय त्याला देऊ करते; परदेशी जाण्याची संधी चालून येते. पत्नीने तर निकराने बजाविले आहे की, तिला संसारसुखाच्या वर्षावाखाली गुदमरून जायचे आहे. भौतिक सुख आणि दुसरीकडे आत्मिक समाधान अशा विचित्र

परिस्थितीमध्ये निर्णय घेताना तो सांगतो, "संसाराच्या या चौकटीत मी आता इतक्या हसऱ्या चेहऱ्यानं जाऊन बसणार आहे, की माझ्या या तडफडीचा मागमूसही कुणाला लागणार नाही." महाराष्ट्रीय कलोपासकाने केलेल्या प्रयोगात, दिवाणखान्यात एरवी शोभेची वस्तू असावी तसा, पण अर्थ सुचविणारा, एक पंख पसरलेला गरुड, भिंतीमध्ये ठोकलेला दाखविला होता. आजच्या जागतिकीकरणाच्या गलबल्यामध्ये असे किती गरुड घरोघरी असतील, ते त्या त्या घरांनाच माहीत!

शं. गो. साठे यांचे 'पहाटेची चाहूल' हे नाटक १९६० मधले. मोठ्या कारखान्यातील आपल्या नोकरीत जयंत गुलाम असला, तरी घरी आल्यावर चार भिंतींतल्या टीचभर जागेत का होईना, पण तो सम्राट आहे. पण कारखानदारी त्याच्या घराचे घरपणच गिळू पाहते, 'तुम्हाला ज्या जगात राहायचं आहे, तर तुम्ही त्याच्यासारखं बनलं पाहिजे' असं निक्षून सांगते. 'हजारोंच्या समूहाचा विचार करून निर्णय घ्यावे लागत असताना व्यक्तीला काही महत्त्वच उरलेलं नाही' असे त्याला बजाविते. आजच्या समूहाच्या जगड्व्याल यंत्रातला व्यक्ती हा बारका स्क्रू आहे हे त्याला साम, दाम वगैरे मार्ग वापरून जाणवून देते आणि तोही 'सर्वनाशे समुत्पन्ने' या न्यायाने, तडजोड करतो. त्या वेळी त्याच कारखान्यातला सन्तू नावाचा एक कामगार मात्र, आपले स्वत्व जपण्यासाठी सर्वस्व पणाला लावतो. साठे यांना 'सन्तू' मध्ये 'पहाटेची चाहूल' दिसते. भालबा केळकर यांच्या प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशनने या नाटकाचा सुरेख प्रयोग सादर केला होता.

'धन्य मी, कृतार्थ मी' आले १९६५ मध्ये. महाराष्ट्रीय कलोपासक या संस्थेने त्याचा पहिला प्रयोग १९६५ मध्ये केला व त्या प्रयोगात मी एक भूमिका केली होती. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी बोलून दाखविले होते की 'धन्य मी, कृतार्थ मी' हे 'नाटक' नव्हतेच मुळी! त्यांचे म्हणणे आम्ही समजू शकलो होतो. रूढार्थाने, त्या नाटकात 'नाट्य' नव्हते. तरुण पिढीची मानसिक कुचंबणा त्या नाटकामध्ये साठे यांनी व्यक्त केली होती. "मला काय वाटतंय ते कुठं कोण मला विचारतंय? आई-वडील दोघेही आपापल्या दृष्टीनं आपापल्या अपेक्षेप्रमाणं माझ्याकडे पहाताहेत" जसा त्या पिढीचा आक्रोश म्हणजे हे नाटक. नाटकाअखेरी स्वतःचे मन मारून, अरुण बाजाची पेटी दूर सारतो; अभ्यासाला लागतो. आईवडिलांना कसे अगदी कृतार्थ वाटते! नाटकाअखेरी नाटककार म्हणून साठे यांनी रंगसूचना दिली आहे. "पार्श्वसंगीतात कोणीतरी भेसूर हसत असल्यासारखा मधूनच पेटीचा खर्जातला विसंवादी सूर ऐकू येतो."

लौकिक यश आणि आत्मिक समाधान या दोन्हींमध्ये सापडलेल्यांची फरफट साठे यांनी आणखी अधोरेखित केली ती 'ससा आणि कासव' या नाटकामध्ये. विजया जयवंत (मेहता) यांच्या 'रंगायन'ने ते रंगमंचावर आणले. 'ससा आणि कासव' ही पारंपरिक







गोष्ट उलटी करून, आयुष्यात वेगाने पळणारा ससाच नेहमी विजयी होतो, हे विदारक सत्य साठे यांनी त्या नाटकात सांगितले आणि यंत्रयुगातील कानमंत्र कोणता असणार आहे, ते स्पष्ट केले.

शं. गो. साठे यांच्या नाटकांची संरचना पारंपरिक पद्धतीची असली आणि तिथे त्यांनी वेगळी वाट शोधली नसली तरी नाटकाच्या विषय-आशयावावतीत मात्र साठे यांनी त्यांच्या काळाशी संधान ठेवले. आणि साठे यांचा कालखंड अजून संपलेला नसल्याने, आजही त्यांची नाटके विषय-आशयापुरती, आजचीच वाटतात. मोजकीच नाटके लिहिणाऱ्या 'साठे' यांच्याबद्दल तेंडुलकर, भालबा,. राजा नातू, विजया मेहता, दत्ता भट, रामदास भटकळ यांना विशेष आस्था वाटत होती, ती उगीच नाही.

२७ डिसेंबर २००० ला साठे कायमचे निघून गेले. त्यांच्या जाण्याबरोबर आधुनिक मराठी रंगभूमीवरील एक महत्त्वाचा नाटककार नाहीसा झाला आहे. पण आपल्यातच रममाण झालेल्या आपल्या रंगभूमीचा पडदा काही साठे यांच्या निधनानंतर थरथरला नाही, याला काय म्हणावे?

२२७/१, कसवा पेठ, पुणे - ११

❑

## वसंतराव कानेटकर - एक संपन्न व्यक्तिमत्त्व

○

- डॉ. वि. वि. घाणेकर

जानेवारी २००१ मध्ये ज्येष्ठ नाटककार प्रा. वसंत कानेटकर यांचे निधन झाले. ज्येष्ठ नाटककार, प्राध्यापक, वक्ते, इतिहासाचे अभ्यासक वगैरे भूमिका कानेटकर यांनी यशस्वी रीतीने पार पाडल्या. शोकांतिकेपासून सुखात्मिकेपर्यंत त्यांचा नाट्य-लेखनाचा प्रवास होता. स्वचिंतनावर व अभिव्यक्तीच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास होता. संवादातून अनेक वेगवेगळ्या उत्तुंग व्यक्तिरेखा त्यांनी उभ्या केल्या. भीष्म, संभाजी, शिवाजी, ताराराणी, कर्वे, राजवाडे, बाबा आमटे वगैरे भूमिका त्याची उदाहरणे आहेत. शेक्सपियर हा जगातील नामवंत नाटककार त्यांचा आदर्श होता. घरामध्ये ते ज्येष्ठ कवी गिरीश यांचे पुत्र असल्याने त्यांच्यावर उत्तम संस्कार झाले होते.

प्रा. वसंत कानेटकर हे काहीसे संकोचि, समाजामध्ये न मिसळणारे असे होते. एका मुलाखतीत स्वतः कानेटकरांनीच 'एकलकोंडेपणा' ही माझी प्रकृती आहे. दरबार भरविणे

पसंत नसल्यानेच माझ्याकडून एवढे लिखाण झाले, असे सांगितलेले आहे.

वसंतराव हे फारसे लोकांमध्ये मिसळत नसत, असा त्यांच्याबद्दल लोकापवाद आहे; परंतु वसंतराव सुरुवातीला काहीसे तुटक वागत असले तरी एकदा त्या माणसाची पारख त्यांना झाली की ते खूपच बोलत असत, असे माझे मत आहे. ज्या व्यक्तीबद्दल त्यांचे मत अनुकूल असेल त्या व्यक्तीशी ते मनसोक्त बोलत असत व हातचे काही राखून ठेवत नसत, असा माझा अनुभव आहे.

शेक्सपियर हा जगातील थोर नाटककार कानेटकरांचा आदर्श होता. 'गरूडझेप' हे नाटक त्यांच्या शेक्सपियर-प्रीतीचे उत्तम उदाहरण आहे. शेक्सपियरने लिहिलेल्या नाटकांपेक्षा अधिक नाटके त्यांना लिहावयाची होती. मला साहित्याची आवड असल्याने काही नाटकांबाबत मी तयार केलेले आराखडे वसंतरावांना दाखविले होते. त्या वेळी ते म्हणाले, "हे ठीक आहे, परंतु नाटके लिहिण्यापूर्वी तुम्ही कमीत कमी शेक्सपियर हा नाटककार अभ्यासला पाहिजे." त्यांनी मला शेक्सपियरची एक-दोन नाटके वाचावयास दिली होती. आणि म्हणूनच इंग्लंडमध्ये गेल्यानंतर मी शेक्सपियर राहात असलेले घर बघितले होते. त्या वेळेला शेक्सपियरबरोबरच मला कानेटकरांचीही आठवण झाली.

१९६० नंतर मराठी रंगभूमीला जी नव्याने टवटवी आली त्यामागे कानेटकरांची नाटके प्रामुख्याने उभी आहेत. एकाहून एक सरस अशी लोकप्रिय नाटके त्यांनी लिहिली. प्रेक्षकाभिरुची लक्षात घेऊन आणि कलेची पथ्येही सांभाळून नाटके बेतणारा त्यांच्यासारखा दुसरा नाटककार चालू काळात झाला नाही असे म्हणता येईल. नाट्यरचनेचे त्यांनी एक तंत्र तयार केले हे खरे असले तरी तंत्रजन्य निर्जीवता त्यांनी कटाक्षाने टाळली. नाही तर त्यांची लोकप्रियता शेवटपर्यंत कशी टिकून राहिली असती?

प्रा. कानेटकरांना नीटनेटकेपणाची आवड होती. त्यांना निळा रंग जास्त आवडत असे, असे मला वाटते. त्यांना सेंटची आवड होती. पोशाखाच्या नीट-नेटकेपणावर त्यांचा भर होता. मला आठवतंय, ठाणे येथील साहित्य सम्मेलनात त्यांनी केलेले भाषण हे उत्तम वक्तृत्वाचे चालते-बोलते उदाहरण होते. आज वसंतराव आपल्यामध्ये नाहीत, पण त्यांच्या नाटकांच्या रूपाने ते आपल्यामध्ये सातत्याने राहतील. त्यांना माझी भावपूर्वक श्रद्धांजली.

१२०८ अ/२, आपटे रस्ता, पुणे - ४

❑

म. सा. परिषदेच्या शाखा भिवंडी (जि. ठाणे) व श्रीक्षेत्र देहू (जि. पुणे) येथे नुकत्याच सुरू झाल्या. अंबरनाथ शाखेतर्फे ५वे ठाणे जिल्हा साहित्य संमेलन अलिकडे साजरे झाले. या साऱ्यांचा वृत्तांत पुढील अंकी.

# प्रा. गो. म. कुलकर्णी : विवेकनिष्ठ लेखनसोहळा

○

## - डॉ. कल्याण काळे

मराठीतील ज्येष्ठ आणि थोर समीक्षक आणि विचारवंत प्रा. गो. म. कुलकर्णी यांचं दि. १ एप्रिल २००१ रोजी पुण्यात निधन झालं. मृत्युसमयी त्यांचं वय ८७ वर्षांचं होतं. गेली ३-४ वर्षे ते अंथरुणाला खिळून असल्यासारखेच होते. या काळात अनेक व्याधींनी त्यांना ग्रासलं. नागीण झाली, पाय मोडला, मधुमेहाचा प्रादुर्भाव झाला; पण या व्याधींना ते अगदी तटस्थपणे सामोरे गेले. पण जेव्हा त्यांची दृष्टी क्षीण झाली आणि त्यांचं वाचन थांबलं, कानांनी ऐकू येईनासं झालं, त्यांचं फिरणं बंद झालं त्या वेळी मात्र त्यांच्या अदम्य जिजीविषेनं ठाव सोडला. सतत वाचन, लेखन, मनन, चर्चा यात काळ व्यतीत करणाऱ्या 'गो. मं.' ना त्यांच्या अवयवांच्या या असहकारामुळं निराशेनं घेरलं आणि 'अशा जगण्यापेक्षा मरण बरं' अशी भाषा 'गो. मं.' च्या तोंडी प्रथमच येऊ लागली. अखेर ईश्वरानं त्यांची हाक ऐकली आणि एका तपस्वी जीवनाचा अंत झाला.

'गो. म.' खरोखरच एक सत्पुरुष होते. मनात एक आणि बाहेर एक असा द्विधाभाव त्यांच्यापाशी कधीच नव्हता. त्यांचं सगळं बोलणं, लिहिणं अगदी मनःपूर्वकतेतून होत असे. संतवाङ्मय त्यांनी अभ्यासलं होतं. ते केवळ पांडित्यप्रदर्शनासाठी नव्हे, त्याचे संस्कार त्यांच्या हाडीमासी खिळले होते. त्यांनी जे. कृष्णमूर्ती वाचले होते, महर्षी अरविंद वाचले, ज्ञानदेव तर त्यांच्या जिव्हारीच मुक्कामाला होते. इतर संतही त्यांनी बारकाईनं अभ्यासले होते. याच संस्कारांनी 'गो. मं.' ना ऋजुता दिली, विचारांचा प्रामाणिकपणा दिला, जगाचं मैत्र करण्याची प्रेरणा दिली. स्वतःचं वय, वाङ्मय-क्षेत्रातील प्रतिष्ठा इत्यादींचा विचार न करता समोरच्या व्यक्तीमधील यत्किंचितही गुणाबद्दल कौतुक करण्याचा मनाचा मोठेपणा दिला आणि स्वतःच्या वैयक्तिक अडचणींचा उच्चार न करता, त्या शांतपणे सहन करण्याची स्थितप्रज्ञताही दिली. त्यांना त्रास देणारे अनेक भेटले. अकारण द्वेष करणारेही लोक भेटले, पण खासगीत अथवा प्रकटपणे त्यांनी कुणाबद्दलही कधीही तक्रार केली नाही, त्यांच्याबद्दल चुकूनही गैरशब्द काढला नाही. 'गो. म.' त्यांच्या बाजूने तरी अजातशत्रूच राहिले. असं हेवा करण्याइतकं संस्कारसंपन्न जीवन ते जगले. आपलं वाङ्मयक्षेत्र अनेक गटांत आणि कंपूंमध्ये विभाजित झालेलं आहे. पण 'गो. मं.'चं सर्वच गटांशी सौहार्द्र होतं. दलित, ग्रामीण, नवे, जुने, कलावादी, जीवनवादी, परिवर्तनवादी, पुनरुज्जीवनवादी, स्त्रीवादी, जनवादी, मार्क्सवादी, फुले-आंबेडकरवादी इ. सर्वच गटांची



अनुक्रमणिका

दारं गो. मं. ना उघडी होती. सर्वत्र त्यांचा अकुतोभय संचार होता, संपर्क होता. या सर्वांसाठी त्यांच्या मनात आपुलकी होती. त्यामुळे त्यांचं वाङ्मयीन जीवन सर्वार्थानं समृद्ध होतं.

'गो. म.' सांगलीला शिकत असताना ते प्रा. रा. श्री. जोगांच्या सान्निध्यात आले. त्यांचा त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर खूप प्रभाव होता. योगायोगाने त्यांनीही जोग सरांच्याप्रमाणे आरंभीच्या काळात कविता लिहिल्या होत्या. नंतरच्या काळात जोग- सरांप्रमाणेच तेही एक श्रेष्ठ समीक्षक म्हणून ख्यातनाम झाले. एकदम टोकाची भूमिका न घेणे, आपली पसंती-नापसंती अगदी संयत शब्दांत व्यक्त करणं, आधारावाचून कोणतंही विधान न करणं, समोरच्या माणसाची भूमिका नीट समजून घेऊन, त्याच्याशी सहानुभूती बाळगूनच आपली स्वतंत्र मतं मांडणं हे जोग सरांचे स्वभावविशेष 'गो. मं'ना भावले आणि स्वतःमध्येही त्यांनी ते उतरविले. त्यांना प्रभावित करणारी दुसरी व्यक्ती म्हणजे वामन मल्हार जोशी हे होत. 'गो. मं.'नीच स्वतः हे सांगितलं आहे. "वामन मल्हार जोशी हे माझे आवडते व्यक्तिमत्त्व आहे. माझ्या महाविद्यालयीन जीवनातच मी त्यांचे वाङ्मय वाचून त्यांच्याकडे आकृष्ट झालो. पुढे त्यांच्या साहित्यविचाराकडे मी ओढला गेलो. त्यांच्या तत्त्वचिंतक लेखनामुळे माझ्या विचारांमध्ये, माझ्या जाणिवांमध्ये काही एक फरक होत गेला, असेही आज मला मागे वळून पाहताना वाटते.... त्यांची समीक्षापद्धती आणि त्यांची तत्त्वमंथनाची रीती बरेच काही सांगणारी आणि शिकवणारी आहे. त्यांची दृष्टी एकाच वेळी सूक्ष्म आणि व्यापकही आहे. जीवनाची उकल करून घेण्याकरिता स्वतःच्या नव्हे तर दुसऱ्याच्या, समोरच्यांच्या डोळ्यांनी जीवनाकडे बघायला हवे, हा वामन मल्हारांच्या विचारांचा सारांश सांगता येईल." वामन मल्हार जोशी यांच्या विवेकनिष्ठ लेखनाचा कित्ताच जणू गो. मं. नी आपल्या समीक्षालेखनात गिरवला. डॉ. र. वा. मंचरकर यांनी म्हणूनच त्यांच्याबद्दल लिहिताना 'गोविंद मल्हार हे आपल्या पिढीचे वामन मल्हार आहेत' असं मत व्यक्त केलं आहे. ते अगदी सार्थ वाटावं असंच 'गो. मं.'चं व्यक्तिमत्त्व होतं.

'गो. मं.'चं सर्व लेखन - रसग्रहण कला आणि स्वरूप, वामन मल्हार जोशी (साहित्य अकादमीसाठी लिहिलेली पुस्तिका) यांचा अपवाद वगळता - स्फुट लेखांच्याच स्वरूपाचं आहे. त्यांचे जवळजवळ शे-सव्वाशे स्फुट लेख प्रसिद्ध झाले. साहित्यविषयक विचार, समीक्षाविषयक विचार, संतसाहित्याची समीक्षा, वाङ्मयेतिहास, साहित्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी, नवे वाङ्मयीन प्रवाह, साहित्यकार-त्यांच्या साहित्यकृती आणि साहित्यप्रकार यांचे अभ्यास असे स्थूलमानाने त्यांचे विषय आहेत. त्यांच्या संकीर्ण स्फुट लेखांचे त्या त्या विषयात वर्गीकरण करून संग्रह अलीकडे प्रसिद्ध करण्यात आलेले आहेत. कोणताही विषय असो, त्याची विविधांगाने मांडणी करत, निरनिराळे प्रश्न उभे करत, त्याची सर्वांगीण चर्चा करणं हे 'गो. मं.'च्या लेखनाचं वैशिष्ट्य आहे. त्यांचा एक-एक लेख एका

विस्तीर्ण ग्रंथाचा आवाका असलेला असतो. त्यासाठी त्यांनी घेतलेले परिश्रम हे त्या लेखाच्या पानोपानी दिसणाऱ्या तळटीपांमधून दिसून येत असतात. 'गो. मं.' चं वाचन अफाट होतं. पण ते वाचकांच्या अंगावर येत नाही. प्रत्येक विषयाचं त्यांनी सखोल चिंतन केलेलं असतं. त्यातून निघणाऱ्या अनेक प्रश्नांचा त्यांनी विचार केलेला असतो. त्यांचे निष्कर्ष ठाम आणि परखड असतात. पण 'गो. म.' कधीही आक्रमक भाषा वापरत नाहीत. समोरच्या माणसाला योग्य तो न्याय देऊनच ते आपली मतं मांडत असतात. आपली विवेकनिष्ठा ते कधीही सोडत नाहीत.

कोणत्याही साहित्यिक घटिताचा विचार ते एकटेपणानं करत नाहीत. त्याची ऐतिहासिक पार्श्वभूमी, त्याचं सांस्कृतिक पर्यावरण, तत्कालीन सामाजिक परिस्थिती या समग्र व्यूहाच्या परिप्रेक्ष्यात ते त्याचा अभ्यास करतात. त्यामुळे त्या घटिताचा यथार्थ अभ्यास होतो. टोकाचे निष्कर्ष टळतात. संतवाङ्मय हे टाळकुट्यांचं वाङ्मय आहे, संतांनी राजकीय क्रांती घडवली. संत चातुर्वर्ण्याचे समर्थक होते, संत स्त्रीद्वेष्टे होते अशी विधानं जी केली जातात ती या परिप्रेक्ष्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे केली जातात. त्यामुळे ती त्यांचं यथार्थ मूल्यमापन ठरत नाहीत असं त्यांचं मत होतं. समीक्षेच्या सर्व प्रकारांमध्ये समाजशास्त्रीय समीक्षा ही गो. मं. ना अधिक जवळची वाटे. यापूर्वी श्रीधर व्यंकटेश केतकरांनी थोडीफार समाजशास्त्रीय पद्धतीने समीक्षा केली होती. त्यांनी आपल्या कादंबऱ्यांतूनही समाजशास्त्रीय सिद्धांत मांडले होते. गो. मं. नी अशी वाङ्मयनिर्मिती केली नसली तरी समाजशास्त्रीय समीक्षा अधिक परिष्कृत केली. त्यांचा 'दलित साहित्याचा समाजशास्त्रीय-वाङ्मयीन अभ्यास' हा ग्रंथ, 'दलित साहित्यः प्रवाह आणि प्रतिक्रिया' हा डॉ. विद्याधर पुंडलिकांच्या सहकार्याने त्यांनी पूर्ण केलेला प्रकल्प, कराडच्या साहित्य संमेलनाच्या निमित्ताने त्यांनी संपादित केलेली 'अभिरुचीः ग्रामीण आणि नागर' हा ग्रंथ, 'गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य' हा त्यांचा निबंध, वाङ्मयेतिहासविषयक त्यांचं सर्व लेखन, 'आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी' हा त्यांचा ग्रंथ, हे सर्व लेखन त्यांच्या या समाजशास्त्रीय दृष्टीचे द्योतक आहे. त्यांनी इतर प्रकारचं लेखन केलं नाही असा याचा अर्थ नाही. त्या त्या साहित्यकृतीने जे प्रश्न उपस्थित केलेले असतात त्या त्या प्रश्नाच्या अनुषंगाने त्या साहित्यकृतीचा अभ्यास करणं ही त्यांची पद्धती आहे. 'ज्ञानेश्वरांचा साहित्यविचार' हा त्यांचा निबंध या दृष्टीने पाहाण्यासारखा आहे. ज्ञानेश्वर साहित्याकडे संस्कृत साहित्यशास्त्राच्या दृष्टीने बघता येणार नाही. ते आध्यात्मिक काव्य आहे. त्याची प्रत आणि पोत ठरविण्याचा एक उत्कृष्ट प्रयत्न त्यांनी या निबंधात केला आहे. केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज, बोरकर या कवींचे संग्रह त्यांनी संपादित केले आहेत. ते एका साहित्यकाराचा अभ्यास या दृष्टीने लक्षणीय आहेत. रसग्रहणावरील पुस्तकातील त्यांची रसग्रहणे आस्वादक समीक्षेचे नमुने आहेत.

समीक्षेकडे केवळ प्राप्तकर्तव्य म्हणून न पाहता गांभीर्यानं कसं पाहता येतं याचा 'गो. मं.' चे ग्रंथ एक वस्तुपाठ ठरतील. त्यांची समीक्षा स्वागतशील असून प्राचीन-अर्वाचीन, आधुनिक-नव, ग्रामीण, दलित अशा विविध स्तरांतील साहित्यात त्यांनी रस दाखविला आहे. साहित्यप्रांतात चाललेल्या सर्वच प्रामाणिक प्रयत्नांबद्दल त्यांच्या मनात जिज्ञासा आणि कुतूहल असे. कोणतेही पूर्वग्रह न बाळगता त्या त्या लेखकाच्या प्रयत्नाबद्दल पूर्ण सहानुभूती ठेवून ते निखळ वाङ्मयीन दृष्टीने त्याची चिकित्सा करीत. आपल्याला पडलेल्या प्रश्नांची त्याच्याशी चर्चा करीत. त्याची भूमिका समजून घेत आणि पूर्ण विवेकनिष्ठेने आपला अभिप्राय मांडत. त्यांचा सर्व लेखन प्रपंच म्हणजे विशुद्ध वाङ्म्मयीन दृष्टीने साजरा केलेला, उद्‌बोधक आणि आल्हादक असा विवेकनिष्ठ लेखनसोहळाच वाटतो.

दीपक सहनिवास ९२/३, तुळशीबागवाले कॉलनी, गोळवलकर गुरुजी रस्ता,
पर्वती, पुणे - ४११००९ फोन - ०२०-४२२५६०३

❑

## ज्ञानसाधक : डॉ. शंकरराव खरात

O

- डॉ. गं. ना. जोगळेकर

अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतून मार्ग काढीत स्वकर्तृत्वावर पुढे आलेल्या डॉ. ॲड. शंकरराव खरात यांचे ९ एप्रिल २००१ रोजी निधन झाले. आटपाडी या माणदेशातील लहान गावात शंकररावांचे बालपण गेले. त्या काळात समाजात खोलवर भिनलेल्या जातीय उच्चनीचतेचे दर्शन त्यांना विद्यार्थिदशेत झाले. शिक्षणाची प्रेरणा त्यांना वडिलांकडून आणि नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांकडून मिळाली. फर्ग्युसन महाविद्यालय आणि लॉ कॉलेज येथे त्यांचे शिक्षण झाले. मात्र शंकरराव आयुष्यभर ज्ञानार्थीच राहिले. लेखन-वाचनाची संगत त्यांनी कधीच सोडली नाही. डॉ. बाबासाहेबांच्या सहवासात यायला मिळाले हा त्यांचा मोठा भाग्ययोग, मात्र त्यांनी त्याचे कधी भांडवल केले नाही. त्यांनी घरी पत्नी, मुलगा, मुली या सर्वांना शिक्षणाची प्रेरणा देऊन एक संपूर्ण घरच सुशिक्षित आणि सुसंस्कृत केले. संपत्तीचा मोह त्यांना कधी पडला नाही. शेवटपर्यंत ते अगदी साधे राहिले. त्यांनी वकिली केली, पण या पेशात ते कायमचे अडकून पडले नाहीत.

शंकररावांना स्वातंत्र्यानंतर विकासाच्या अनेक वाटा मोकळ्या झाल्या. लोकसेवा आयोगाचे सदस्य, रेल्वे बोर्डावर सेवक निवड मंडळाचे अध्यक्ष, अनेक शासकीय समित्यांचे

अध्यक्ष अशा अनेक पदांवर त्यांनी काम केले. मानसन्मान, प्रतिष्ठा मिळविण्यासाठी नव्हे; तर गुणी तरुणांना योग्य संधी मिळवून देण्यासाठी या पदाचा आपण उपयोग केला पाहिजे' ही त्यांची सदैव दृष्टी होती. याच जाणिवेने त्यांनी मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरूपद स्वीकारले व त्या पदाची प्रतिष्ठा वाढविली.

सर्वसामान्यांना शंकरराव माहीत झाले ते लेखक म्हणून. आचार्य अत्र्यांच्या 'नवयुग' साप्ताहिकामधून ते नियमितपणाने लिहू लागले. 'बारा बलुतेदार' हे त्यांचे पुस्तक 'नवयुग' मुळेच निर्माण झाले. ज्या काळात 'दलित साहित्य' हा शब्दप्रयोग प्रचारात आला नव्हता, त्या काळातले शंकरराव हे प्रमुख लेखक. (बाबुराव बागूल, आण्णाभाऊ साठे व नारायण सुर्वे हेही त्याच काळाचे प्रतिनिधी होत.) त्यांचे सगळे लेखन अनुभवातून, निरीक्षणातून आणि अभ्यासातून निर्माण झाले आहे..

शंकररावांचा पिंड एकाच वेळी ललित आणि वैचारिक लेखकाचा होता. 'सांगावा', 'दौंडी' या संग्रहांतून कथाकार शंकररावांचे दर्शन घडते. स्वातंत्र्यानंतर बदलत (आणि बिघडत) गेलेल्या समाजाचे दर्शन शंकररावांनी थेटपणाने घडविले. 'झोपडपट्टी', 'गावचा टिनोपाल गुरुजी', 'बेरड', 'गावशिव' ही त्यांची पुस्तके या दृष्टीने अभ्यासण्यासारखी आहेत. 'मी माझ्या गावाच्या शोधात' या पुस्तकातून त्यांचे अस्वस्थ मन जाणवते. आणि 'तराळ-अंतराळ' हे त्यांचे आत्मकथन तर सामाजिक दस्तऐवज ठरले आहे. शंकररावांनी अस्पृश्यतेच्या झळा अनुभवल्या, आपली प्रक्षुब्ध प्रतिक्रियाही शब्दांकित केली. पण ते केवळ आक्रोश आणि वेदना या परिघात फिरत राहिले नाहीत. प्रत्येक प्रश्नाचा अभ्यासू वृत्तीने ते वेध घेत राहिले. यामुळेच त्यांचे "दलित वाङ्मय : प्रेरणा आणि प्रवृत्ती' हे पुस्तक या प्रकारच्या इतर पुस्तकांपेक्षा अगदी वेगळे वाटते.

ललित आणि वैचारिक लेखनाइतकेच शंकररावांनी जे संशोधनात्मक लेखन केले, त्याचे महत्त्व विशेष आहे. 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची पत्रे', 'डॉ. बाबासाहेबांच्या सहवासात', 'डॉ. बावासाहेबांचे धर्मान्तर-आंदोलन' ही पुस्तके लिहून शंकररावांनी फार मोठे वाङ्मयीन कार्य केले आहे. शंकररावांनी या प्रकारचे लेखन शेवटपर्यंत चालू ठेवले होते. भारतीय राज्यघटनेसंबंधीचा विवेचनात्मक ग्रंथ मृत्यूपूर्वी केवळ एक महिना आधी त्यांनी हातावेगळा केला होता.

शंकरराव मानसन्मानाच्या मागे कधीच धावले नाहीत. मानसन्मान त्यांच्याकडे चालत आले. १९८४ मध्ये जळगाव संमेलनाचे ते अध्यक्ष झाले. (सायकलवरून फेरफटका मारणारा अध्यक्ष जळगावकरांना पाहायला मिळाला!) पुणे विद्यापीठाने त्यांना डी. लिट्. ही मानाची पदवी दिली. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने त्यांना गौरववृत्ती प्रदान केली.

"ज्ञानसाधकांच्या थोर परंपरेतला एक साधासुधा निगर्वी माणूस" ही त्यांची प्रतिमा मराठी लेखकांना व अभ्यासकांना दीर्घ काळ प्रेरणा देत राहील. म. सा. परिषदेच्या या भूतपूर्व अध्यक्षांना परिषदेची श्रद्धांजली.

२२ मनीषा सोसायटी, पुणे - ५२.

❑

## प्रदीर्घ सार्थकी आयुष्य : मालतीबाई बेडेकर

(१-१०-१९०५ ते ६-५-२००१)

○

- प्रा. सुजाता शेणई

वैचारिक आणि ललित अशा दोन्ही प्रकारचे लेखन मालतीबाई बेडेकरांनी केले. मराठी साहित्य विश्वात ज्या विषयांवर लेखन झाले नव्हते ते विषय म्हणजे कुमारी माता, अविवाहित प्रौढा, परित्यक्ता, सकेशा विधवा या विषयांवर त्यांनी धीटपणे लेखन केले. कुणीही उघडपणे न मांडलेल्या प्रश्नांना आपल्या लेखनामधून वाचा फोडली. त्यांची गणना बंडखोर लेखिका म्हणून झाली. आजूबाजूची सामाजिक परिस्थिती पहाता आणि कन्याशाळेतील नोकरीचा विचार करता मालतीबाईंना टोपणनावाचा आधार घ्यावासा वाटला. 'विभावरी शिरूरकर' हे टोपणनाव त्यांनी धारण करून भरपूर टीका सहन केली. स्वतःवरचे मृत्युलेख आणि प्रेतयात्राही पाहिली.

मालतीबाईंचे मूळ नाव बाळूताई खरे. मालतीबाई आणि त्यांची भावंडे बंडखोर आणि स्वतंत्र विचार-सरणीची झाली, याला कारण त्यांचे वडील खरे मास्तर हे होत. मुलींनी इंग्रजी शिकावं, उच्च शिक्षण घ्यावं, नोकरी करावी, आपले 'वर' आपण शोधावेत यासाठी ते स्वतः उत्तेजन देत. स्वतंत्र आणि सुधारकी विचारांच्या आपल्या वडिलांविषयीच्या भावना मालतीबाईंनी 'खरे मास्तर' या पुस्तकातून व्यक्त केल्या.

समाजाच्या अगर राष्ट्राच्या इतिहासाची साधने जतन केली जातात, त्याप्रमाणे जुन्या शास्त्रांचाही संग्रह केला जातो. अलंकार शास्त्राचे जतन आणि त्या दृष्टीने संशोधन करून 'अलंकार मंजुषा' या प्रबंधाचे लेखन केले. स्त्रीचे वैदिक काळातील उच्च स्थान आणि वर्तमानकाळात मिळणाऱ्या स्थानांची व हक्काची जाणीव करून द्यावी म्हणून 'स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा' या पुस्तकाची निर्मिती झाली. प्राचीन धर्मशास्त्र, प्रचलित हिंदू कायदा व त्याची सुधारणा हे तीनही विषय एकदम दृष्टीसमोर राहतील या हेतूने 'हिंदु-व्यवहारधर्म-

आहेत, असे आपण म्हणतो किंवा उद्योग म्हटला तरी ग्रामीण भागातील उद्योग आणि शहरी भागातील उद्योग यात भेद आहे असे दिसून येईल. मानवी स्वभाव हा इथून तिथून सारखाच असतो असे आपण म्हणतो खरे, परंतु परिस्थितीप्रमाणे आपण प्रदेशाप्रमाणे ह्याला वेगळे कंगोरे प्राप्त होतात, हेही कवूल करतो. म्हणूनच आपण जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये ग्रामीण आणि शहरी असा भेद करतो, तशी शव्दरचना करतो. ग्रामीण शिक्षण, ग्रामीण राजकारण, ग्रामीण अर्थकारण, ग्रामीण समस्या इ. शव्द आपण वापरत असतो. हे नुसते शव्द असत नाहीत तर त्याद्वारे ध्वनित होणारे अर्थ एक विशिष्ट अशी जीवनपद्धती ध्वनित करीत असतात.

प्राचीन काळापासून ग्रामीण आणि नागर हे दोन्ही शव्द अस्तित्वात आहेत. याचा अर्थ असा की प्राचीन काळात मध्ययुगामध्येही नगरे अस्तित्वात होती. कदाचित संख्येने थोडी असतील, परंतु शहरे होती असे दिसते. प्राचीन काळातील उज्जैन, हस्तिनापूर सारखी नगरे काय किंवा मध्ययुगातील इंदौर, औरंगावाद यांसारखी नगरे काय ही खेड्याच्या तुलनेने खूपच मोठी असणार यात काही शंका नाही. तरीही आजच्यासारखी अवाढव्य महानगरे होती असे मात्र कोणीही म्हणणार नाही. जुन्या साहित्यातून, दंतकथांमधून आलेली वर्णने पाहता ती अतिशयोक्त आहेत, किंवा त्यात गौरवाचा भाग आहे हे कोणीही कवूल करील. तरीही खेड्यांपासून वेगळी असणारी नगरे प्राचीन काळी आणि मध्ययुगातही होती यावद्दल दुमत असण्याचे कारण नाही. आजच्यासारखी ही नगरे नसली तरी ती नगरे होती. कारण तेथे नगरजन रहात होते. म्हणजे राज्यकारभार करणारा अधिकारी वर्ग, त्यांची वेगवेगळी कार्यालये, न्यायदानाच्या तत्कालीन सुविधा, शिक्षणाची काही एक व्यवस्था, सैन्यदले इ. गोष्टी नागर भागात केंद्रित झालेल्या दिसतील. व्यापार हाही नागरभागाचा विशेष असल्याचे दिसते. आजही यात फार वदल झाला आहे, असे नाही. उलट प्रचंड मोठ्या प्रमाणात उद्योगांची वाढ शहरांच्या भोवती झाली आहे. याचा अर्थ असा की, जेथून काहीएक व्यवस्थापन केले जाते, तो भाग म्हणजे नागर अगर शहरी भाग. भारताचे प्रमुख वैशिष्ट्य मानल्या गेलेल्या शेतीशी या नगरांचा दुरान्वयानेच संवंध यायचा आणि येतो. याचा परिणाम जीवनाच्या सर्वच भागांवर पडलेला दिसेल. उदा. अभिजन अभिरुची आणि वहुजन अभिरुची. या पद्धतीने विचार करू लागले की संस्कृतप्रचुर लिहिणारे मराठी पंडित कवी नागर भागाशी संवंधित असावेत असे वाटू लागते. अभंग व लावण्या लिहिणारे कवी ग्रामीण भागाशी संवंधित आहेत असे दिसू लागते. या दृष्टीनेही वाङ्मयाच्या अभिरुचीचा अभ्यास करता येऊ शकेल असे वाटते. एकंदरीत काय की, व्यवस्थापनाशी निगडित असणाऱ्या गोष्टी जेथे एकवटल्या आहेत (तसेच शेतीशी फारसा संवंध नाही) तो विभाग म्हणजे नागर विभाग किंवा शहरी विभाग असे म्हणता येऊ शकेल. अर्थात नागर आणि ग्रामीण या दोन्ही विभागांमध्ये काही आदानप्रदान चालत होते

हे उघड आहे. आजही हे आदानप्रदान आहेच आणि त्याचे परिणामही परस्परांवर होतात हेही उघड आहे.

असे सगळे असले तरी 'ग्रामीण' आणि 'नागर' या संज्ञा ठसठशीतपणे जाणवू लागल्या, त्या मात्र औद्योगिकीकरणानंतरच! म्हणजे इंग्रजांच्या आगमनानंतर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून पुढे आपल्याकडे औद्योगिकीकरणाला प्रारंभ झाला. साधारणतः १८८० च्या दरम्यान आपल्याकडे मोठ्या प्रमाणात कापड कारखाने उभे राहू लागले. इतरही उद्योगधंदे शहरांमधून स्थिर होऊ लागले. रेल्वेसारखे वाहतुकीचे साधन उपलब्ध झाले. इतरही सुविधा उपलब्ध होऊ लागल्या. परिणामतः आपल्या देशात एक प्रक्रिया सुरू झाली. ती प्रक्रिया म्हणजे आपापले खेडे सोडून लोक हळूहळू शहरांकडे जाऊ लागले. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले तर कोकणातून आणि एकूणच महाराष्ट्रातून लोकांचा लोंढा मुंबईकडे येऊ लागला आणि शहरांच्या आकारमानात गतीने वाढ होऊ लागली. मुंबई, कलकत्ता ही तर आज महानगरे झालीच आहेत, पण इतरही अनेक गावे महानगरांच्या दिशेने वाटचाल करू लागलेली आहेत. या प्रक्रियेला प्रारंभ मात्र एकोणिसाव्या शतकाच्या मध्यात झाला, हा ऐतिहासिक संदर्भही लक्षात ठेवावा लागतो.

'ग्राम' आणि 'नगर' या जुन्याच संज्ञा असल्या आणि त्यात सीमारेषा असली तरी ती वाढायला कारण झाले ते औद्योगिकीकरण. यावरोवरच आणखी एका कारणाचा निर्देश करावा लागेल. हे कारण म्हणजे इंग्रजांनी आणलेली सार्वजनिक शिक्षण पद्धती. शिक्षणाच्या सार्वत्रिकरणाचे दूरगामी परिणाम आपल्या देशावर झाले यात काही शंका नाही. या शिक्षणाचे स्वरूप इंग्रजी राजवटीला मदत करणारे होते, हे लॉर्ड मेकॉलेच्या उद्‍गारावरून स्पष्टच होते. तरीही या सार्वत्रिक शिक्षणामुळे आपल्या देशाचे स्वरूप बदलायला मदत झाली. असे असले तरी हे शिक्षण प्रारंभी शहरांमधूनच केंद्रित झालेले होते. महाराष्ट्रापुरते वोलायचे तर ते मुंबई आणि पुणे या दोन शहरांपुरते होते.

प्रारंभीच्या ज्या शैक्षणिक आणि इतरही चळवळी झाल्या त्या या दोन शहरांपुरत्या मर्यादित होत्या. ग्रामीण भागात शिक्षणाचा पायरव सुरू व्हायला कर्मवीर भाऊराव पाटलांसारखी ध्येयाने पछाडलेली माणसे व्हावी लागली; परंतु हे फार उशिरा झाले. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे शिक्षणाचा खरा प्रचारप्रसार स्वातंत्र्यानंतरच सुरू झाला. याचा अर्थ एवढाच की, नवे शिक्षण आले ते प्रथमतः शहरांमध्ये. या नव्या शिक्षणामुळेही ग्रामीण आणि शहरी या दोन संज्ञा आधिक ठळक झाल्या. याच ठिकाणी आणखी एका वावीचा निर्देश करावयास हरकत नाही. ती बाव म्हणजे आधुनिक शिक्षणाचे 'पुस्तकी पण'. साधारणतः या शिक्षणामुळे एक प्रक्रिया घडत गेली आणि खेड्यापासून माणूस तुटत गेला. म्हणजे औद्योगिकीकरणामुळे पोट भरण्यासाठी जशी माणसे शहरात स्थायिक होऊ लागली, त्याप्रमाणेच शिकून आणि आपले पारंपरिक व्यवसाय सोडून माणसे शहरात

स्थिर होऊ लागली. शहरे अवाढव्य होऊ लागली. सगळ्या सोयीसुविधा शहरांमध्येच एकवटू लागल्या. जणू काही अर्थव्यवस्थेचे केंद्र केवळ शहर आहे असे गृहीत धरले जाऊ लागले. म्हणूनच मागच्या शतकात म. फुले यांनी गोळा होणाऱ्या कराचा हिशेब मांडला होता. त्यांनी असे ठणकावून सांगितले होते, की सरकार मोठ्या प्रमाणात खेड्यापाड्यांतून कर गोळा करते आणि खर्च मात्र अधिक मोठ्या प्रमाणात शहरांवर, शहरांतील शिक्षणावर करते.

याचा अर्थ असा की औद्योगिकीकरण, नवे शिक्षण जसजसे वाढत गेले तसतशी शहर आणि खेडे यांच्यातील विभाजनरेषा अधिकाधिक वाढत गेली. एकप्रकारे अर्थव्यवस्थेत जसजसा बदल होत गेला तसतसे हे अंतर वाढत गेले आणि ठळकपणे 'ग्रामीण' ही संज्ञा आकाराला येत गेली. साधारणतः मराठीमध्ये जाणीवपूर्वक ग्रामीण साहित्याच्या निर्मितीला १९२० नंतर प्रारंभ झाला असे नोंदविले जाते आणि ते अंशतः बरोबरही आहे, त्याचे कारणच मुळी हे आहे. १९२० च्या दरम्यान 'ग्रामीण' जीवन ठळकपणे वेगळे असल्याचे जाणवू लागले होते. एवढेच नाही तर ग्रामीण जीवनाची घडणही वेगळी असल्याचे म्हटले जाऊ लागले होते. म. गांधी यांनी 'खेड्याकडे चला' अशी हाक या ऐतिहासिक टप्प्यावर दिली. त्याचे कारणही या बदलत्या जीवनातच आहे. बदलत्या अर्थव्यवस्थेत आहे. म्हणूनच 'ग्राम इलाखा' केंद्रस्थानी ठेवून देशाच्या अर्थव्यवस्थेचे नियोजन केले पाहिजे, असे त्यांना वाटत होते. त्यासाठी त्यांनी मूलोद्योगप्रणित शिक्षणाचा विचारही मांडला होता. हे सारे १९२० च्या आसपास जोर धरू लागले, याचा अर्थच मुळी असा आहे की शहरे आणि खेडी यांमधील अंतर ठळकपणे नजरेत भरू लागले आहे.

परंतु या प्रक्रियेला प्रारंभ मात्र मागच्या शतकातच झाला, हेही उघड आहे. नव्या राजवटीमुळे नव्या अर्थव्यवस्थेमुळे आणि औद्योगिकीकरणामुळे ग्रामीण जीवनात अनेकविध प्रश्न निर्माण होऊ लागले होते, याची तुरळक का होईना नोंद एकोणिसाव्या शतकातील साहित्यात सापडते. लोकहितवादी यांनी लिहिलेला 'ग्रामरचना' हा छोटेखानी ग्रंथ या दृष्टीने महत्त्वाचा आहे. एवढेच नाही तर भारतीय शेतीकडेही ते काहीशा डोळस नजरेने पहात होते असे दिसते. त्यांनी भारतीयांचे अनेक दोष दर्शविले आहेत. भारतीय जीवनातील अनेक कोड्यांचा निर्देश केला आहे. त्यापैकी एक कोडे भारतीय शेती आहे, असे त्यांना वाटते. संस्थाने क्रमाने खालसा होऊ लागली. याचा परिणाम शेतीवर झाला याची नोंद त्यांनी केली आहे. शेतीवरील बोजा वाढतो आहे, असे त्यांनी म्हटले आहे. त्यांचे आणखी एक निरीक्षण फार महत्त्वाचे आहे आणि ते म्हणजे शेती- मालाच्या उत्पादनाचा बाजारात मिळणारा भाव. त्यांनी हिशेब मांडून असे दाखविले आहे की, हळद पिकविणाऱ्या शेतकऱ्याला प्रत्येक एकरामागे रु. दहा तोटा सहन करावा लागतो. दीडशे वर्षांपूर्वीचे त्यांचे निरीक्षण निश्चितच मोलाचे आहे. याचा अर्थ असा की एकीकडे शहरे वाढताहेत

आणि दुसरीकडे खेड्यातील शेतीचा धंदा परवडण्यासारखा उरलेला नाही. म्हणजे दारिद्र्यामुळे ग्रामीण भागाचे ग्रामीणत्व अधिक ठळक होऊ लागले होते, असे म्हणावे लागते. ताराबाई शिंदे आपल्या 'स्त्रीपुरुषतुलना' या छोटेखानी निबंधात 'कारागिरांची कारागिरी संपत असल्याचा' निर्देश करतात. हे कोणते कारागीर आहेत ? खेड्यापाड्यांतून छोटे छोटे धंदे करणारे लोक त्यांच्या डोळ्यासमोर असावेत असे वाटते. याचा अर्थ असा की औद्योगिकिकरणाचा वाढता वेग आणि ग्रामीण भागाचे क्रमाने मागलेपण यांच्यामध्ये निश्चितच काही नाते आहे. या वास्तवाचा प्रखर आविष्कार झाला आहे, तो म. फुले यांच्या 'शेतकऱ्यांचा आसूड' या ग्रंथामध्ये. शेतकरी आणि एकूण ग्रामीण इलाखा कसा सर्व बाजूंनी होरपळून निघतो आहे याचे फार प्रभावी चित्रण त्यांनी केले आहे. अर्थात तत्कालीन दुष्काळाची पार्श्वभूमीही या ग्रंथनिर्मितीसाठी कारण झाली आहे. पण एवढेच नाही. मागच्या शतकातच संपूर्ण भारतभर शेतकऱ्यांचे लढे उभे राहू लागले होते. पंजाब, आसाम पासून महाराष्ट्रापर्यंत ग्रामीण भाग तापून निघाला होता. महाराष्ट्रात जे लढे झाले ते 'डेक्कन रॉयटस्' या नावाने ओळखले गेले.

असे असले तरी 'ग्रामीण' आणि 'शहरी' या दोन संज्ञा १९२० नंतर अधिक अर्थपूर्ण झाल्या. म. गांधी यांच्याबरोबरच डाव्या चळवळींना आपल्या देशात प्रारंभ झाला आणि सदाशिव पेठेबाहेर फार मोठा समाज आहे याचे भान येऊ लागले. मराठी लेखक कवी ग्रामीण जीवनाचे चित्रण केले पाहिजे, असे म्हणू लागले. मराठीत जानपद गीतांच्या रूपाने ग्रामीण कविता येऊ लागली. याच गीतांना किसान गीते, गोपगीते असेही म्हटले जात होते.' याच ऐतिहासिक टप्प्यावर वि. स. सुखटणकरांच्या रूपाने 'प्रादेशिक' साहित्य येऊ लागले. प्रारंभी जरी प्रादेशिक असे नामकरण झाले नसले तरी साधारणतः १९३० च्या दरम्यान 'प्रादेशिक' ही संज्ञा वापरली जाऊ लागली. म्हणजे 'जानपद साहित्य' आणि 'प्रादेशिक साहित्य' साधारणतः १९२० नंतर मराठीत सुरू झाले असे म्हणता येईल. त्याची ऐतिहासिक कारणे कोणती होती याचा काहीसा निर्देश वर आलाच आहे.

१९२० नंतर ग्रामीण साहित्याच्या निर्मितीला प्रारंभ झाला. 'जानपद' चे 'ग्रामीण' कधी झाले ते निश्चितपणे सांगता येत नसले तरी साधारणतः श्री. म. माटे लिहू लागल्यानंतर 'ग्रामीण' ही संज्ञा रूढ झाली असावी असे वाटते. (येथे संशोधकांना वाव आहे!) काहीही असले तरी १९२० नंतर मराठीमध्ये वेगवेगळ्या वाङ्मय प्रकारांमध्ये ग्रामीण जीवनचित्रणाला प्रारंभ झाला. कविता, कथा आणि कादंबरी या तीन वाङ्मय प्रकारांमधून ग्रामीण जीवन प्रकट व्हायला लागले. ग.ल. ठोकळ, र. वा. दिघे, वि. वि. हडप, सोपानदेव चौधरी, यशवंत, गिरीश अशी काही कवी-लेखकांची नावे प्रारंभाचे लेखक म्हणून सांगता येतील. अर्थातच त्या काळात हे लेखन आपल्या नावीन्यामुळे चटकन रसिकमान्य झाले. ग्रामीण जीवनाचे चित्रण करणारे हे लेखन आपल्या वैशिष्ट्यांमुळे

लोकांना आवडू लागले. पुढे ना. सी. फडके आणि र. वा. दिघे या दोघांच्या कादंबऱ्यांना विभागून पारितोषिक मिळाले होते, अशी नोंद सापडते. ही नोंद अनेक अर्थाने महत्त्वाची आहे.

१९२० च्या आसपास सुरू झालेले हे ग्रामीण साहित्य आजही विविध अंगांनी विकसित होत आहे. या साहित्याचा विशेष म्हणजे कविता, कथा, कादंबरी या वाङ्‌मयप्रकारातून विपुलपणे लिहिले जाते आहे. त्या त्या काळातील महत्त्वाच्या लेखकांची आपण नोंद करू लागलो की, ग्रामीण लेखकांचा निर्देश करावाच लागतो. ग.ल. ठोकळ, र. वा. दिघे, वि. वा. हडप, श्री. म. माटे, व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, आनंद यादव, रा. रं. बोराडे, उद्धव शेळके, मनोहर तल्हार, विश्वास पाटील, भास्कर चंदनशिव, ना. धों. महानोर, इंद्रजित भालेराव अशी एक सलग परंपरा निर्देशिता येते. त्या त्या काळामध्ये त्या त्या लेखक-कवींचे काही एक महत्त्वही मान्य करण्यात आलेले होते आणि आहे. मराठी वाङ्‌मयाच्या समृद्धीमध्ये ग्रामीण साहित्याने भरच टाकलेली आहे; तरीही 'ग्रामीण' म्हणजे नेमके काय? याबद्दल मात्र संभ्रम आहे. विशेषतः ग्रामीण साहित्याच्या चळवळीबद्दल जेव्हा चर्चा सुरू झाली, तेव्हापासून ग्रामीण साहित्याबद्दल काहीएक प्रतिकूलही बोलले जाऊ लागले.

याचा अर्थ असा आहे की, ८०वर्षांपासून ग्रामीण साहित्य निर्माण होत आहे, मराठी साहित्यात त्यामुळे लक्षणीय भर पडत आहे; तरीही ग्रामीण साहित्याबद्दल विस्ताराने लिहिले गेले नाही. समीक्षा व्यवहार सगळा नागर साहित्याच्या संदर्भातच होत असल्यामुळे असे झाले असले तरी कारणे कोणतीही असोत या साहित्यासंबंधी आस्थेवाईकपणे चर्चा झाली नाही, हे मात्र सत्य आहे. या संदर्भात प्रा. गो. म. कुलकर्णी म्हणतात, "ग्रामीण साहित्य रूढ होऊन आज किती तरी काळ लोटला आहे.'ग्रामीण' या विशेषणाने वलयांकित होणारे साहित्यही विपुल प्रमाणात होत आहे. तथापि या साहित्याच्या प्रेरणा, स्वरूप आणि समस्या यांचे सविस्तर उपपादन करणारी समीक्षाकृती आजही उपलब्ध नाही. ग्रामीण साहित्याच्या कितीतरी मागून आलेल्या आणि तिखट झालेल्या दलित साहित्यावर बघता बघता चार-सहा ग्रंथ पैदा व्हावेत आणि ग्रामीण साहित्याचा परामर्ष घेणारा एकही ग्रंथ आज उपलब्ध होऊ नये हे चमत्कारिकच नव्हे काय? दलित साहित्याच्या समीक्षेला चढलेल्या भरतीची संगती लावणे अवघड नाही. पण ग्रामीण साहित्यांच्या तीव्र उपेक्षेची कारणे मात्र नीटशी न उमगणारी, ग्रामीण साहित्य हे पृथगात्म न मानता, मध्यवर्ती मराठी साहित्याचीच एक रेषा मानली गेल्याचा हा परिणाम असावा. कारणे कोणतीही असोत, या साहित्याची समीक्षादृष्ट्या आबाळ झाली या वस्तुस्थितीत फरक पडत नाही."

हे प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे विधान आनंद यादव यांच्या 'ग्रामीण साहित्यः स्वरूप आणि समस्या' या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेतील आहे. हे विधान करूनही १७-१८ वर्षे

लोटली आहेत. या कालावधीत ग्रामीण साहित्यासंबधी काही पुस्तके प्रसिद्ध झालेली असली तरी परिस्थितीत फ़ारसा फरक पडलेला आहे असे मात्र म्हणता येत नाही. याचा अर्थ एवढाच की ग्रामीण साहित्याचा पद्धतशीर विचार झाला नाही, तसेच ग्रामीण साहित्यातील महत्त्वाचा घटक 'ग्रामीण' याचाही विचार झाला नाही. असा विचार करण्याची गरजच नाही असेही प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्यासारख्या समीक्षकांना वाटते. 'आपण ग्रामीण साहित्य, ग्रामीण साहित्य म्हणून या साहित्याचे किती दिवस कौतुक करणार आहोत? या पलीकडे जे जीवन येत असते ते पाहिले पाहिजे.'

जीवन समजून घेतले पाहिजे हे तर खरेच, परंतु ग्रामीण साहित्याचे कौतुक कधी झाले ते मात्र कळत नाही आणि ग्रामीण म्हणजे काय ते नीट कळल्याशिवाय कौतुक तरी कसे करता येणार आहे?

खरे म्हणजे कुठल्याही साहित्यकृतीमागे ज्याप्रमाणे लेखक उभा असतो त्याप्रमाणे त्या साहित्यामागे आणि लेखकामागेही एक स्वतंत्र असे अनुभवविश्व उभे असते. त्यात मग प्रदेश येईल, त्या प्रदेशातले जीवन येईल, तिथल्या प्रथा येतील, तिथले समाजजीवन येईल, कारण लेखक काही कुठल्या पोकळीत लिहीत नसतो. म्हणून ग्रामीण साहित्य समजून घ्यायचे असेल तर 'ग्रामीण' म्हणजे काय हेही नीटपणे समजून घेतले पाहिजे. परंतु 'ग्रामीण' म्हणजे काय ? 'ग्रामीणत्व' नेमके कशात असते याची मराठीमध्ये चर्चा झालेली आहे असे दिसत नाही. पुष्कळदा 'ग्रामीण' आणि 'प्रादेशिक' यांमध्ये काही फरक नाही असे म्हटले गेले, तर कधी कथेसाठी 'ग्रामीण' आणि कादंबरीसाठी 'प्रादेशिक' असे विशेषण वापरले गेले. याशिवाय ग्रामीण साहित्य म्हणजे अज्ञान, अंधश्रद्धा आणि रूढीप्रियता असेही म्हटले गेले. यामागे ग्रामीण माणसाविषयी शहरी माणसाच्या मनात असलेले समज-गैरसमजही असू शकतात. कारण अज्ञान, अंधश्रद्धा आणि रूढीप्रियता ही काही केवळ ग्रामीण समाजाचीच लक्षणे आहेत असे नाही. आज मुंबईसारख्या महानगरामध्ये किती दारिद्र्य आहे, हे येथे सांगण्याचे कारण नाही. तसेच अंधश्रद्धा आणि रूढीप्रियता हे तर एकूण भारतीय समाजाचेच वैशिष्ट्य होय. शहरांमधून वाढणारी मंदिरांची संख्या आणि त्या मंदिरांपुढल्या वाढत्या रांगा काय सांगतात? मुंबईसारख्या औद्योगिक नगरीमध्ये 'जातपंचायती' अजूनही कार्यरत आहेत, असे सांगितले जाते. तेव्हा प्रमाण कमीअधिक असेल इतकेच काय ते ! परंतु केवळ रूढीप्रियता, केवळ अंधश्रद्धा म्हणजे ग्रामीण जीवन नव्हे. याच्या पलीकडे कुठे तरी 'ग्रामीणते'चा शोध घ्यावा लागतो.

आणि हा शोध घेताना प्राचीन काळापासून झालेली खेड्याची घडण लक्षात घ्यावी लागते. या घडणीमधून जीवन जगण्याची एक रीत साकारत गेली. ही रीत म्हणजे ग्रामीणत्व असे म्हणता येऊ शकेल. ही रीत प्राचीन काळापासून नागर जीवनापेक्षा वेगळी आहे.



अनुक्रमणिका

भारतीय खेड्याची रचना, समाजव्यवस्था बघितली की या जगण्याचे वेगळेपण लक्षात येते. ती पुष्कळशी स्वतंत्र, स्वयंपूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. युगानुयुगापासून चालत आलेल्या या रचनेमुळेच येथील माणसांच्या जगण्याची एक विशिष्ट अशी रीत साकार होत आली.

(ग्रामीण भागामध्ये काळी आणि पांढरी असे दोन शब्द जुन्या काळापासून वापरण्यात येतात. काळी म्हणजे भूमी, शेती. आणि या भूमीच्या दृष्टीने, शेतीच्या दृष्टीनेच पांढरीचीही उभारणी होत असे. या पांढरीमधील कोणते घर कुठे असावे, मंदिर कुठे, पाटलाचे घर कुठे असावे, हेही ठरलेले असे. अशा प्रकारे ग्रामरचनेचे आठ प्रकार असल्याची नोंद संस्कृती कोशामध्ये सापडते.)

(अर्थातच ही खेड्याची बाह्यरचना होय; परंतु ही सगळी रचना शेतीशी बांधली गेली आहे. आणि या शेतीमधूनच खेड्याची एक आंतररचनाही साकार झालेली दिसते. या आंतररचनेमधूनच एक ग्रामसंस्कृती आकाराला आलेली दिसेल आणि त्यामुळेच ग्रामीण माणूस या ग्रामसंस्कृतीशी पक्का बांधला जातो. अशी ही ग्रामसंस्कृती वैशिष्ट्यपूर्ण आणि स्वयंपूर्ण अशी होती. ती स्वयंपूर्ण असल्यामुळेच स्वतंत्रही होती.) या ग्रामरचनेचा गौरव करताना कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी 'खेड्याचा राजा पाटील, ..... ब्राह्मणापासून ते महारमांगांपर्यंत सर्व जातींचे अलुतेबलुते उर्फ कारू नारू याची वासरे. ही गावगाड्याची घटना व परिभाषा फार पुरातन आहे' असे म्हटले आहे. तसेच देशात पुष्कळ राज्यव्यवस्था आल्या आणि गेल्या तरी ग्रामव्यवस्था मात्र तीच राहिली असेही ते सांगतात. एवढेच नाही तर शिवाजी महाराजांसारखा राजा निर्माण करण्याचे श्रेयही ते या ग्रामरचनेलाच देतात.

(अशी ही एक स्वतंत्र रचना ग्रामीण भागात अस्तित्वात होती. आजही काही प्रमाणात आहे. या स्वतंत्र रचनेला 'गावगाडा' असे म्हटले गेलेले आहे. या गावगाड्यामध्ये जमीन कसणारा आणि कारू नारू हे घटक महत्त्वाचे होते. ग्रामीणतेची संकल्पना समजून घेण्यासाठी 'गावगाडा' समजून घेणे अतिशय आवश्यक आहे.) या गावगाड्याचा अभ्यास साधारणतः शंभर वर्षांपूर्वी श्री. त्रिं. ना. आत्रे यांनी केला आहे.

ग्रामसंस्कृती आणि गावगाड्याचा वेध घेणारे हे मराठीतील पहिलेच पुस्तक आहे (१९१५).)

प्राचीन काळापासून खेडे कसे आकाराला येत गेले त्याचा त्यांनी फार चांगला वेध घेतला आहे. 'गावगाडा' म्हणजे गावावर रचलेले एक सांग रूपकच आहे, असे त्यांना वाटते. युगानुयुगापासून चालत आलेल्या या गावगाड्याचे स्वरूप कसे आहे, तो कसा चालला आहे, त्यात कोणकोणते घटक आहेत आणि बदलत्या काळानुसार त्यात कोणत्या सुधारणा होणे गरजेचे आहे याचे फार तपशीलवार विवरण त्रिं. ना. आत्रे यांनी केले आहे. खेडोपाडी हिंडून त्यांनी जमविलेली माहिती, घेतलेल्या मुलाखती यांचा वापर करून

लिहिलेल्या या ग्रंथातून खेड्याची सामाजिक आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचे.म्हणजे आर्थिक रचना ते उलगडून दाखवितात. म्हणूनच त्यांनी Notes on rural socialogy and village problems with special reference to agriculture असे इंग्रजी उपशीर्षक या ग्रंथाला दिले आहे.

हा ग्रंथ समाजशास्त्रीय स्वरूपाचा असला तरी उत्तम मराठी गद्याचा आविष्कार म्हणूनही लक्षणीय आहे. बुद्धिनिष्ठ दृष्टी आणि प्रत्यक्ष अनुभवांचा आधार इथल्या गद्याला लाभल्यामुळे ते अधिकच परिणामकारक झाले आहे. या ग्रंथातून शेतकऱ्याला समजून घेण्याचा अधिकाधिक प्रयत्न असला तरी ग्रामविभागातील इतर घटकांनाही लेखकाने समजावून घेतले आहे. एकंदरीत अतिशय चिकित्सक तरीही समंजस दृष्टी असल्यामुळे हा ग्रंथ ग्रामीणता समजावून घेण्यासाठी अतिशय उपयुक्त आहे.

त्रिं. ना आत्रे यांच्या दृष्टीने ग्रामविभागाचे निःसंदिग्ध वैशिष्ट्य कोणते असेल तर ते शेती. नागरविभाग हा शेतीपेक्षा इतर बाबींवरच अधिक भर देतो हे त्यांनी अनेक ठिकाणी सूचित केले आहे. आज तर हे अधिकच खरे आहे, हे निराळे सांगण्याची आवश्यकता नाही.

शेती हे जर ग्रामीण विभागाचे प्रमुख वैशिष्ट्य असेल तर शेतीला पूरक होईल अशीच ग्रामरचना साकार होईल हे उघड आहे. तेव्हा शेती केंद्रस्थानी आणि त्याला अनुरूप अशी इतर सर्व रचना हे ग्रामरचनेचे मुख्य सूत्र आहे हे उघड आहे. त्यांनीही काळी आणि पांढरी मिळून गावाचा 'देह' होतो असे म्हटलेले आहे.

(त्रिं. ना. आत्रे यांच्या 'गावगाडा' या ग्रंथानंतर ना. गो. चापेकर यांचा 'आमचा गाव बदलापूर(१९३४)' हा ग्रंथ आणि वि.म. दांडेकर व जगताप यांचा 'गावरहाटी (१९६५)' हा ग्रंथ म्हणजे परंपरागत मराठी ग्रामजीवनाचे एक अन्तर्बाह्य वस्तुनिष्ठ दर्शन घडविणारे लेखन होय. या सर्व ठिकाणी शेती हे ग्रामजीवनाचे केंद्र आणि तिच्या दृष्टीने आवश्यक असणाऱ्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष गोष्टींचा समावेश असलेला परिघ म्हणजे खेडे हेच सूत्र सोदाहरणरीत्या मांडलेले आहे. शेती करणाऱ्यांबरोबरच कारू नारू किंवा अलुतेदार बलुतेदार यांची खेड्यातील उपस्थिती अवश्यमेव असल्याचेच हे सर्व अभ्यास दर्शवितात. त्यातून खेडे या संकल्पनेची विविध अंगे स्पष्ट होत जातात.)

(या संस्कृतीमधला एक अतिशय महत्त्वाचा घटक म्हणजे निसर्ग. संपूर्ण ग्रामीण जीवन या निसर्गाने वेढलेले असते. निसर्गाशिवाय ग्रामीण जीवन संभवूच शकत नाही. गावगाड्याची चाकेही हा निसर्गच असतो आणि निसर्ग हा अपरिमित असतो, अतर्क्यही असतो. उदा. भारतीय शेती ही पावसावर अवलंबून असणारी गोष्ट आहे आणि पाऊस हा लहरी आहे. म्हणून निसर्ग हाही लहरी आहे.

निसर्गाच्या या लहरीपणामुळेच शेतकरी आणि कृषिसंस्कृतीशी निगडित असणारी

माणसे दैववादी होण्याची शक्यता असते. एकीकडे गावगाड्यात बांधले जाणे आणि दुसरीकडे निसर्गावर अवलंबून राहणे यातून त्याचे मन स्वाभाविकपणेच आदिमतेकडे झुकत जाते. ही आदिम भाववृत्ती नागर माणसाला पुष्कळदा कळत नाही. या आदिमतेमागील कारणे कळू शकत नाहीत. म्हणूनच ग्रामीण साहित्य म्हणजे अज्ञान, रूढीपरंपरा जपणाऱ्या अंधश्रद्धा असे म्हटले जाते.)

निसर्ग गूढ, अनाकलनीय, अपरिमित आणि अतर्क्य असल्यामुळेच ग्रामीण माणूस आदिम बाबींशी बांधला जातो.

'कोणती पुण्ये अशी येती फळाला

जोंधळ्याला चांदणे लखडून जावे.'

असं ना. धो. महानोर म्हणतात तेव्हा ते अनाकलनीय असलेल्या निसर्गापुढे विनम्र होऊन मानवी आदिम जाणीव व्यक्त करताहेत असे म्हणावे लागते.

म्हणजे कृषिसंस्कृतीत वाढणारे, वावरणारे मन हे सतत आदिम संकल्पनांशी बांधले जाण्याची शक्यता असते. येथे ग्रामीण माणूस अज्ञानी नसतो, की अंधश्रद्धही नसतो. तो असतो एका कृषिसंस्कृतीचे अपत्य. म्हणून त्याच्या मनात लोकभ्रमांना, लोकरूढींना, लोकविधींना आणि लोकसमजुतींना महत्त्वाचे स्थान असते. कारण या साऱ्याच गोष्टींना ग्रामसंस्कृतीमध्ये संदर्भ असतात

कृषिकेंद्रित संस्कृतीचे निसर्गसन्मुख असणे हे एकूण जीवनरचनेला आकार देत असते. त्यातून ग्रामीण माणसाचे एक 'लोकमानस' तयार होते. लोकमानस म्हणजे काय या संदर्भात लोकसाहित्याचे अभ्यासक डॉ. प्रभाकर मांडे म्हणतात, "भाषा, रूढी आणि मिथ्स यामुळे विचारशक्ती नियंत्रित होते. Conditioning होते." याचा अर्थ असा की ग्रामीणतेचा शोध घ्यावयाचा असेल तर ग्रामीण माणसाचे 'लोकमानस' काय आहे ते शोधावे लागते. किंबहुना 'ग्रामीण वास्तवातील ग्रामीण 'लोकमानस' महत्त्वाचे ठरत जाते.

अर्थात शहरी माणसाचेही एक लोकमानस असतेच. त्यातही विधी, परंपरा इ. गोष्टींना महत्त्व असतेच; परंतु त्यापेक्षा ग्रामीण लोकमानस वेगळे असते हे मात्र निश्चित. असे एक वेगळे लोकमानस गावगाडा संस्कृतीमधून सतत प्रकटत असते. आदिम स्वरूपाचे घटक हे त्याचे भाग असतात. किंबहुना रा. चिं. ढेरे यांनी म्हटल्याप्रमाणे ते प्रगती करतानाही आदिमतेशी संबंध ठेवूनच प्रगती करीत असते.

या सगळ्या गोष्टी सहानुभूतिपूर्वक नीट समजून घेतल्या की, 'फकिरा', 'धग', 'गोतावळा', 'पाचोळा', 'टारफुला', 'वनगरवाडी' यांसारख्या कादंबऱ्या नीट कळतात. तसेच इतरही ग्रामीण साहित्य अधिक प्रत्ययकारी होत जाते.

ग्रामीण संस्कृतीची रचनाच मुळी निसर्गसन्मुख शेतीमुळे झाली आहे, हे लक्षात घेतले

की ग्रामीण भागात एकत्र कुटुंबपद्धतीला का महत्त्व असायचे तेही कळते. किंवा सोईरसंबंध प्रस्थापित करताना मोठ्या कुटुंबाला का महत्त्व दिले जायचे, तेही कळते. आज खेड्यातही विविध कारणांमुळे विभक्त कुटुंबे आकाराला येऊ लागली आहेत, हा भाग वेगळा; परंतु एकत्र कुटुंबपद्धती आणि शेतीसाठीचे माणूसबळ यात एक नाते आहे.

ज्या जातीव्यवस्थेच्या विरोधात आपण सतत गेल्या शंभर वर्षांत बोलतो आहोत, ती व्यवस्थाही कृषिसंस्कृतीचीच उपज होय असे म्हणावयास हरकत नाही. शेतीसाठी पूरक उद्योग करणाऱ्या जाती प्रामुख्याने खेड्यात रहात होत्या, हेही येथे लक्षात घेतले पाहिजे. वेगवेगळ्या जाती या शेतीसाठीच प्रामुख्याने अस्तित्वात आल्या, असे म्हणता येईल. अर्थात चार-साडेचार हजार जाती इतरही कारणांमुळे निर्माण झालेल्या आहेत, हे उघड आहे.

हे सगळे समजून घेतले की ग्रामीण साहित्यातून एक व्यवस्था ध्वनित होते. या व्यवस्थेत घडलेल्या माणसाची मानसिकता ध्वनित होते आणि या सगळ्यातून जगण्याची एक रीत प्रकट होते असे म्हणता येईल.

एकंदरीत 'ग्रामीणता' साकार होण्यामध्ये कृषिनिष्ठ संस्कृती, निसर्गसन्मुखता, त्यातून निर्माण झालेले लोकमानस हे घटक महत्त्वाचे ठरतात. यातून जगण्याची एक 'रीत' साकार होत जाते. या रीतीचे चित्रण ज्या साहित्यात आढळते, ते ग्रामीण साहित्य असे म्हणता येईल. परंतु आज एवढ्यावरच थांबता येईल असे वाटत नाही. कृषिजीवनात असंख्य समस्या निर्माण झाल्या आहेत. किंबहुना ही कृषिसंस्कृतीच कुठल्या तरी अर्थव्यवस्थेची अंकित बनून राहिली आहे. नागर जीवनाच्या डामडौलीपुढे कृषिसंस्कृतीचे, कृषिजीवनाचे दुय्यमत्व पदोपदी प्रत्ययाला येत आहे.

यातून असंख्य प्रश्न निर्माण झाले आहेत. पर्यावरणासारखा प्रश्न यातूनच निर्माण झाला आहे. इतरही कितीतरी प्रश्न आहेत. शेतीमालाच्या भावाचा तर प्रश्न आहेच. याचा अर्थ असा आहे की, ग्रामीण जगण्याची रीत आज विस्कटून गेली आहे. (खरे म्हणजे गेल्या शतकापासूनच ती विस्कटू लागलेली आहे.) संपूर्ण ग्रामीण इलाखा असंख्य प्रश्नांनी धगधगू लागला आहे. बी-बियाण्यांच्या प्रश्नांपासून ते बेकारीच्या प्रश्नांपर्यंत अनेक प्रश्न घोंगावू लागले आहेत. जमिनीचे छोटे-छोटे तुकडे, पाण्यावरती धनदांडग्यांची मालकी, शेतमजुरांचा अभाव, लोकशाहीच्या निमित्ताने रोजचेच झालेले राजकारण आणि साखर कारखानदारीसारख्या उद्योगांनी निर्माण केलेले प्रश्न - अशा असंख्य प्रश्नांनी ग्रामीण इलाखा धगधगू लागला आहे. अशा परिस्थितीत ग्रामीण लेखक खेडे म्हणजे धुंदफुंद करणारी रमणीय बाब असे कसे म्हणू शकेल? याचाच अर्थ असा की, 'ग्रामीण' या संज्ञेच्या अर्थात बदल होतो आहे. ग. ल. ठोकळ आणि र. वा. दिघे यांच्या काळात खेडे एक रोमँटिक गोष्ट होती. कारण ती नव्यानेच जाणवू लागली होती. पुढे शंकर पाटील, माडगूळकर यांच्या काळात ती अधिक शोधाचा विषय झाली. वास्तवाचे थोडे भान येऊ

लागले. हे भान उद्धव शेळके, आनंद यादव आणि रा. रं. बोराडे यांच्या पिढीला अधिकच आले. ग्रामीण जीवनातले वास्तव प्रकर्षाने मांडणे आवश्यक आहे असे त्यांना वाटू लागले. परंतु गेल्या पंचवीस वर्षांत 'ग्रामीण' या संज्ञेला अधिकच व्यापक रूप येऊ लागले. केवळ वास्तव सांगणे ग्रामीण लेखकाला पुरेसे वाटेनासे झाले. या वास्तवाच्या मागे असणारे आणखी एक वास्तव आहे आणि ते शोधले पाहिजे असे त्यांना वाटू लागले. ग्राम जीवनामध्ये जे प्रश्न निर्माण झाले आहेत, त्याला कोण जबाबदार आहे? ग्रामीण इलाख्याचे शोषण कोण करीत आहे? विकासाच्या नावाखाली नैसर्गिक जीवन कोण उद्ध्वस्त करीत आहे? शेतकऱ्यांच्या जीवनातील महत्त्वाचे निर्णय कोण घेत आहे? त्याला खरोखर स्वातंत्र्य आहे का? हे आणि यांसारखे असंख्य प्रश्न आजचा ग्रामीण लेखक आपल्या अंतर्मनात उपस्थित करीत आहे. त्याचा त्यांच्या साहित्यकृतींवर परिणाम होत आहे. आणि त्यामुळे आजच्या ग्रामीण साहित्यातून दिसणारे 'ग्रामीणत्व' स्वाभाविकपणेच वेगळे आहे. किंबहुना या वेगळेपणामुळेच त्याला ग्रामीण साहित्याची वेगळी चळवळ असावी असे वाटते आहे.

आज 'ग्रामीणते'च्या संकल्पनेचे स्वरूप काय आहे? या संदर्भात स्थूलपणे असे म्हणता येईल की, 'ग्रामीण जगण्याची वेगळी रीत' हे तर या संकल्पनेत गृहीतच आहे. परंतु त्या पलीकडचेही काही आहे. आपल्या जीवनाला दुय्यमत्त्व देणाऱ्या व्यवस्थेला आजचा ग्रामीण लेखक प्रश्न विचारतो आहे. आपले जगणे विस्कटून टाकणाऱ्या व्यवस्थेच्या विरोधात संघर्ष करायला तो सिद्ध झाला आहे. आपले नेमके शत्रू कोण आहेत, याचा त्याला शोध घ्यावयाचा आहे. एकंदरीत आजच्या ग्रामीणतेच्या संकल्पनेमध्ये संस्कृतीसंघर्षाचाही समावेश करणे गरजेचे झाले आहे आणि ही संस्कृतिसंघर्षाची जाणीव लक्षात घेतली की 'ग्रामीणता' ही एक व्यापक संकल्पना आहे, हे लक्षात यायला लागते.

या नव्या ग्रामीणतेला एक मूल्याधिष्ठित आणि समानतेच्या पायावर उभे असणारे जग अपेक्षित आहे. म्हणूनच 'ग्रामीणता' ही संकल्पना व्यापक तर होत जातेच, पण ती सर्वसमावेशकही होत जाते.) सर्व प्रकारच्या शोषणाविरुद्ध उभ्या राहणाऱ्या साहित्यप्रवाहांची ती सहकारी तरी होईल किंवा अशा प्रवाहांना पोटात घेऊन एक मोठे रूप तरी धारण करील. कारण ती येथील 'देशी' लोकांच्या जगण्याची रीत प्रस्थापित करू पहाते. म्हणून देशीयतेची संकल्पना मांडावयाची असेलच, तर ती ग्रामीणतेच्या अंगांनीच मांडावी लागेल. कारण, सध्या देशीयतेची भोंगळ मीमांसाच चालू आहे!

ओ-५, शिक्षकनिवास, पुणे विद्यापीठ,
पुणे - ४११ ००७. फोन - ५६७३७८१

❑ ❑

○

# निरंजन घाटे यांची पुस्तक-शंभरी

○

- डॉ. दत्तात्रेय पुंडे

गेल्या महिन्यात म्हणजे एप्रिल २००१ मध्ये प्रसिद्ध विज्ञान लेखक निरंजन घाटे यांचे शंभरावे पुस्तक प्रकाशित झाले. तसे पुस्तक शंभरी गाठणारी निरंजन घाटे हे काही मराठीतले पहिलेवहिले लेखक नव्हेत. यापूर्वी काही लेखकांना हे भाग्य प्राप्त झालेले आहे. उदाहरणादाखल येथे वि.आ. बुवा यांचे नाव चटकन आठवते. तरीही पुस्तक-शंभरी गाठल्याबद्दल निरंजन घाटे यांचे अभिनंदन मुद्दाम करावे, अशी काही कारणे आहेत.

पहिली आणि सर्वाधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे घाटे यांची बहुतांश पुस्तके विज्ञानविषयक आहेत. मराठीत त्यांनी सातत्याने विज्ञानविषयक लेखन केले आणि मराठी विज्ञान साहित्याचे दालन समृद्ध करण्यास मदत केली. हे लेखन करीत असताना घाट्यांनी आणखीही एक गोष्ट अगदी सहजपणे केली. ती म्हणजे मराठीत विज्ञानविषयक लेखन करताना, मग ते कोणत्याही प्रकारचे असो, म्हणजे वैचारिक असो, माहितीपर असो, संशोधनपर असो किंवा ललित असो, परिभाषेचा बाऊ करण्याचे कारण नाही, हे घाटे यांनी आपल्या स्वतःच्या लेखनाने जणु सिद्धच करून दाखविले. स्वातंत्र्योत्तर काळात शाळाकॉलेजांतून मातृभाषेतून शिक्षण देण्याचे धोरण आखले गेले. त्याकरिता भारतीय भाषांतून विज्ञानादी विषयांची पाठ्यपुस्तके आणि अभ्यासक्रमपूरक पुस्तके लिहिण्याची गरज निर्माण झाली. अशा काळात, म्हणजे १९६०-७० पर्यंतच्या काळात अनेक इंग्रजी-धार्जिण्या लेखकांनी परिभाषा सिद्ध नसल्यामुळे मराठीतच काय पण कोणत्याही भारतीय भाषेत विज्ञानविषयक ज्ञान आणताच येणार नाही, अशी हाकाटी सुरू केली होती. या पार्श्वभूमीवर निरंजन घाटे यांचे समग्र विज्ञानविषयक मराठी लेखन मुद्दाम निरखून पाहावे. त्यांनी मराठीतून सर्व प्रकारचे म्हणजे संशोधनपर, वैचारिक, माहितीपर व ललित लेखन केलेले आहे. याशिवाय त्यांनी अनेक ललित व ललितेतर विज्ञान पुस्तकांची सरळ मराठीत भाषांतरेही केलेली आहेत. हे सारे करीत असताना घाटे कधीही आणि कुठेही परिभाषेसाठी म्हणून अडून बसले नाहीत. परिभाषा सिद्ध नाही म्हणून मराठीत विज्ञानविषयक लेखन करताना अडचण येते, हा समजच घाटे यांनी खोटा पाडला. कारण विज्ञानविषयक लेखनामध्येही त्यांनी भूविज्ञान, प्राणिविज्ञान, आकाशविज्ञान, अवकाशविज्ञान, युद्धविज्ञान इत्यादी जवळजवळ सर्वच शाखांमधून लेखन केलेले आहे.

विषयांच्या विविधतेप्रमाणेच घाटे यांच्या लेखनात प्रकारांचीदेखील विविधता आढळते. काही लेखक कसे केवळ विज्ञान कथा, केवळ विज्ञान कादंबरी किंवा केवळ माहितीपर विज्ञान लेख लिहून थांबतात; त्यातही काहीजण फक्त प्रौढांसाठी किंवा फक्त किशोरवयीन वाचकांसाठी लिहितात, काही लेखक फक्त पाठ्यपुस्तके व अभ्यासपुस्तके लिहितात. घाटे यांच्या लेखनाला अशी कुंपणे नाहीत. घाट्यांनी विज्ञानकथा लिहिल्या, विज्ञान कादंबरी लिहिली, माहितीपर विज्ञानलेख लिहिले, संशोधनपर विज्ञान निबंध लिहिले, वृत्तपत्रांसाठी विज्ञानविषयक रंजक व चटकदार मजकुरांची सदरे चालविली, बालकिशोरांसाठी विज्ञान कथा, रहस्यकथा, विज्ञान-कोडी, विज्ञान-जिज्ञासापूर्ती असा विविधरंगी मजकूर लिहिला. सगळ्यात अधोरेखित करून सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे या सर्व प्रकारच्या लेखनात त्यांनी कमालीचे सातत्य राखले आहे. घाटे गेली तीस-पस्तीस वर्षे विज्ञान-लेखनाचा झेंडा खांद्यावर घेऊन अथक चालताना दिसतात. मराठीत विज्ञानविषयक लेखन रुजविण्याचा ज्या थोडक्या मंडळींनी प्रयत्न केलेला आहे, त्यांमध्ये निरंजन घाटे हे नाव उठून दिसते.

विज्ञानविषयक लेखनाबरोबरच घाटे यांनी अन्य प्रकारचे ललित आणि वैचारिक लेखनही केलेले आहे. त्यांची वाङ्मयीन कारकीर्द स्वारस्य वाटावी अशीच आहे. घाटे यांनी अनेक नोकऱ्या केल्या (व सोडल्याही). पण लेखन हाच त्यांनी आपला प्रधान व्यवसाय मानलेला दिसतो. जणु लेखन हेच आपले जीवितध्येय आहे, अशा निष्ठेने ते वागत व बोलत असताना दिसतात. म्हणूनच अगोदर म्हटल्याप्रमाणे निरंजन घाटे यांची शंभर पुस्तके आली म्हणून ते अभिनंदनीय आहेत, असे नसून त्यांची लेखननिष्ठा, त्यांचे लेखनसातत्य, त्यांची लेखनविविधता आणि एकूण मराठीतच लिहीत राहण्याचा त्यांचा छंद यामुळे ते अभिनंदनीय ठरतात. एखादा लेखनप्रकार खळाळता, वाहता राहण्यासाठी त्या प्रकारामध्ये सातत्याने लेखन होत राहणे गरजेचे असते. मराठी विज्ञानसाहित्य आपल्या सततच्या नि विविधरंगी लेखनाद्वारे घाटे यांनी खळाळते, वाहते ठेवले म्हणून ते अभिनंदनीय होत. एरव्ही त्यांचे शंभरावे पुस्तक येणे, हे केवळ निमित्त आहे. त्यांचे अभिनंदन करण्याची, त्यांचे अभीष्टचिंतन करण्याची शंभरावे पुस्तक ही एक संधी आहे.

निरंजन घाटे हे पुणे विद्यापीठाचे भूशास्त्र विषयातले एम. एस्सी. पदवीधारक आहेत. १९६८ ते १९७७ या काळात त्यांनी विद्यापीठातच भूशास्त्र विभागात प्रयोगदर्शक आणि अधिव्याख्याता या पदावर काम केले. त्यानंतर ते 'आकाशवाणी'त नोकरीस लागले. नागपूर, जळगाव व सांगली या केंद्रांचे कार्यक्षम अधिकारी म्हणून १९८३ पर्यंत त्यांनी काम पाहिले. याच वेळेला त्यांना नवी दिल्ली येथे झालेल्या नवव्या एशियाड खेळाचे मराठी कार्यक्रम-प्रमुख म्हणून काम करण्याची संधी मिळाली. येथेच हे सांगायला हवे की शाळाकॉलेजच्या दिवसांत निरंजन घाटे मनसोक्त क्रिकेट खेळलेले आहेत. शाळाकॉलेजमधील संघांत त्यांचा क्रिकेटपटू म्हणून समावेश तर असेच, पण त्यांना दोन वेळा सलग दोन वर्षे

(१९६५-६६ व १९६६-६७ आणि १९७१-७२ व १९७२-७३) पुणे जिल्हा सदू शिंदे क्रिकेट स्पर्धेतील उत्कृष्ट गोलंदाजाचा पुरस्कारही प्राप्त झाला होता. त्यामुळे नवव्या आशियाई स्पर्धेतील आकाशवाणीचे मराठी कार्यक्रम संयोजक म्हणून त्यांची कामगिरी उत्तम ठरली यात नवल नाही.

घाटे यांनी आपली अखेरची नोकरी पुण्याच्या महात्मा फुले वस्तू संग्रहालयात केली. तिथे त्यांनी नोव्हेंबर १९८३ पासून मार्च १९८५ पर्यंत उपसंचालक म्हणून काम पाहिले. मार्च १९८५ मध्येच ते संग्रहालयाचे संचालक झाले. डिसेंबर १९९३ मध्ये त्यांनी संग्रहालयाच्या संचालकपदाचा राजीनामा दिला आणि नंतर ते नोकरीच्या वाटेस गेले नाहीत. तेव्हापासून ते लेखक म्हणूनच 'फुल-टायमर' आहेत. फुले संग्रहालयात असताना घाटे यांनी दोन मौलिक गोष्टी केल्या. एक म्हणजे संग्रहालय चालवीत असलेले 'सृष्टिज्ञान' हे नियतकालिक त्यांनी मोठ्या परिश्रमाने व स्वप्रतिभेने उर्जितावस्थेस आणले. आलंकारिक भाषेत बोलायचे झाले तर असे म्हणता येईल की वठत चाललेल्या 'सृष्टिज्ञान' मासिकाच्या खोडाला घाटे यांच्या प्रयत्नामुळे नवी पालवी फुटली. संग्रहालयात घाट्यांनी केलेले दुसरे काम म्हणजे विज्ञानलेखकांचे मेळावे भरविणे त्यांनी सुरू केले. यातून मराठीतून विज्ञानाचा प्रसार होण्याच्या दिशेने बरेच काही साध्य झाले.

निरंजन घाटे यांनी लेखनास सुरुवात केली ती साठोत्तर दशकामध्ये. प्रारंभी प्रथितयश मासिके व नियतकालिके विज्ञानकथा छापण्यास फास उत्सुक नसत. (विज्ञानसाहित्यास मराठीत प्रतिष्ठा प्राप्त होण्यास सत्तरोत्तरी दशक उजाडावे लागले.) पण घाटे नामोहरम झाले नाहीत. त्यांनी आपली विज्ञानकथा रहस्यभेद किंवा रहस्यरंजन या अंगाने जाईल अशी लिहिली आणि सरळ रहस्यकथा नि गुन्हेगारी कथा छापणाऱ्या 'धनंजय', 'निशाचर' यांसारख्या मासिकांतून आपल्या कथा प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. ही मासिके जरी केवळ लोकप्रिय साहित्य छापणारी असली तरी त्यांद्वारे विज्ञानकथा सर्वदूर पसरविण्यात घाटे यशस्वी झाले. इतकेच नव्हे तर मराठी विज्ञान परिषद कथा स्पर्धा (१९७१, ७२ व ७४), नवयुग कथा स्पर्धा (१९७१, ७२, ७३ अशी सलग तीन वर्षे) आणि विरंगुळा नियतकालिक विनोदी कथा स्पर्धा (१९७४) यांमध्ये घाटे यांच्या कथा बक्षीसपात्र ठरल्या. त्यातल्या त्यात १९७४ सालचा नवयुग कथा पुरस्कार घाटे यांना खूप यश देऊन गेला. कारण त्या कथेस्पर्धेतले त्यांच्यासोबतचे दुसरे मानकरी होते, कथाकार चारुता सागर. त्याच काळात चारुता सागरांना कै. गो. गं. लिमये कथा-पुरस्कार मिळाला होता. त्यांच्या 'नागीण' या गाजलेल्या कथेचे खुद्द पु.ल. देशपांडे यांनी जाहीर वाचन केलेले होते. अशा एकदम प्रसिद्धीच्या झोतात आलेल्या चारुता सागरांच्या खांद्याला खांदा लावून उभा राहणारा 'संप्रती कोण हा नवा अवतार?' या कुतूहलाने मराठी वाङ्मयप्रांतातल्या जाणकारांचे लक्ष निरंजन घाटे या नावाकडे वेधले गेले.

यानंतर वर्षभरातच निरंजन घाटे हे नाव पुस्तकावर लेखक म्हणून झळकू लागले. १९७५ साली त्यांची 'रामचे आगम' ही पहिली विज्ञान कादंबरी प्रसिद्ध झाली. १९७५ सालीच या कादंबरीसह त्यांच्या आणखी ३ विज्ञान कादंबऱ्या 'मच्छर', 'कालयंत्राची करामत' आणि 'फिनिक्स' प्रसिद्ध झाल्या. आणि एकाच वर्षी या चार कादंबऱ्या प्रसिद्ध करणारे घाटे चतुरस्र लेखक होण्यास वेळ असा लागलाच नाही. १९७५ ते २००१ या केवळ २५-२६ वर्षांत घाटे यांची छोटी-मोठी, महत्त्वाची-विनमहत्त्वाची, स्वतंत्र-भाषांतरित, प्रौढ वाचकांसाठी-बालकिशोर वाचकांसाठी लिहिलेली १०० पुस्तके आली, हे खरोखरीच एक 'रेकॉर्ड'च झाले म्हणायचे. एकेकाळी क्रिकेट खेळणारे घाटे ग्रंथजगतात शतकवीर झाले. इथेच आणखी एक माहिती मुद्दाम नमूद करावीशी वाटते. ती म्हणजे घाट्यांची जन्मतारीख आहे, १० जानेवारी १९४६. म्हणजे आज ते फक्त ५५ वर्षे वयाचे आहेत. त्यांच्या लेखनाचा हा झपाटा चालू राहील आणि ते द्विशतक सहज गाठतील यात शंका नाही. कारण २००१ सुरू झाल्यापासून आज एप्रिलअखेर त्यांची 'जिज्ञासापूर्ती', 'सेक्सायन', 'वेध पर्यावरणाचा', 'पृथ्वी परिक्रमा' आणि 'आधुनिक अमेरिकन गुन्हेगारी' ही पाच पुस्तके आलेली आहेत. यातले 'वेध पर्यावरणाचा' हे मेहता पब्लिशिंग हाऊसने प्रकाशित केलेले पुस्तक शंभरावे पुस्तक आहे. निरंजन घाटे अनेक पुरस्कारांचे मानकरी झालेले आहेत. महाराष्ट्र राज्य शासनाचे त्यांना ३ वेळा पुरस्कार मिळाले आहेत. त्यातले दोन विज्ञान-तंत्रज्ञान या विभागाअंतर्गत त्यांच्या 'वसुंधरा' (१९७८) आणि 'एकविसावं शतक' (१९९७) या दोन ग्रंथांना, तर एक 'ललित विज्ञान' या विभागाखाली 'स्पेस जॅक' (१९८५) या ग्रंथाला मिळाला आहे. 'आधुनिक युद्धसाधने' (१९९२) या त्यांच्या पुस्तकाला पुणे मराठी ग्रंथालयाचा 'सावरकर पुरस्कार' हा सन्मान्य पुरस्कार प्राप्त झालेला आहे. याखेरीज विज्ञानक्षेत्रातील ज्येष्ठ व्यक्ती डॉ. मो. वा. चिपळूणकर व डॉ. वि. म. गोगटे या नावांशी निगडित असे दोन पुरस्कार त्यांना प्राप्त झालेले आहेत. वाचकांच्या दृष्टीने पाहिले तर निरंजन घाटे यांना एक खास, आगळावेगळा पुरस्कार मिळालेला आहे. तो म्हणजे त्यांच्या 'शस्त्रागार' (१९८६) या भारतीय सैन्यदलातील शस्त्रास्त्रांची वेधक माहिती असणाऱ्या पुस्तकास भारताचे सरसेनापती जनरल अरुण वैद्य यांनी लिहिलेली प्रस्तावना होय. ('शस्त्रागार' पुस्तक प्रसिद्ध होते न होते तोच जनरल अरुण वैद्य यांची पुण्यातच हत्या झाली. त्यामुळे घाटे यांच्या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना हे त्यांचे 'अखेरचे' लेखन ठरते.

पण स्वतः घाटे यांना विचारले तर ते म्हणतात की 'वाचकांची सुखद प्रतिक्रिया हाच सर्वांत मोठा पुरस्कार असतो आणि त्याचे मोल मला खूप वाटते.' काही समकालीन ललित लेखक व विज्ञान-लेखकही घाटे यांच्यावद्दल बऱ्यापैकी स्नेहभाव वाळगून आहेत. कारण आजवर त्यांना १६ लेखकांनी आपापली पुस्तके अर्पण केलेली आहेत आणि सुमेध

रिसवूड(वडावाला) हे सध्याचे प्रसिद्ध नाव या अर्पणकर्त्यांमधले एक आहे. याचे कारण या सोळाजणांसह घाटे अनेक लेखकांचे प्रेरणास्रोत आहेत; घाटे यांनी अनेकांना 'लिहिते' केले आहे.

सतत आणि भरपूर लेखन करणाऱ्या लेखकांना अनेकदा टोपण नावाने लेखन करणे भाग पडते. कधी वृत्तपत्राची वा नियतकालिकाची सुखसोय म्हणून तर कधी लेखकाची स्वतःची गरज व इच्छा म्हणून असे टोपण नावांनी लेखन केले जाते. निरंजन घाटे यांनी स्वतःसाठी अनेक टोपण नावे स्वीकारली आहेत. 'जी. एन्. सिन्हा', 'देवेन कौशिक', 'सुखदेव साळुंखे' इत्यादी टोपण नावांनी त्यांनी आजवर खूप लेखन केले आहे. हे त्यांनी अगदी आरंभकाळापासूनच केलेले आहे. १९७२ साली 'साप्ताहिक मनोहर' मध्ये ते स्वतःच्या निरंजन घाटे या नावानिशी शुद्ध शास्त्रीय विषयावर लिहीत आणि देवेन कौशिक या टोपण नावाने 'मेरी गो राऊंड' हे हलके फुलके सदर चालवीत. घाटे यांनी टोपण नावाने लेखन केले याचे आणखीही एक कारण आहे. ते म्हणजे १९८३ ते १९९३ या काळात घाट्यांनी सृष्टिज्ञान, बुवा, पैंजण, अद्भुत कादंबरी, ज्ञानविकास, किर्लोस्कर इत्यादी नियतकालिकांच्या संपादनाचे काम केले होते. त्या वेळी नियतकालिकांची पाने भरून काढण्यासाठी त्यांना लेखन करावे लागले आणि ते त्यांनी अर्थातच टोपण नावांनी केले.

घाटे यांच्या लेखनातल्या बहुरंगीपणामुळे त्यांना प्रकाशकांची अडचण भासली नाही; प्रकाशकांच्या दारी पायपीट करण्याचा प्रसंग तर त्यांच्यावर कधीच आला नाही. प्रकाशकच त्यांच्याकडे चालत आले. प्रकाशकांबाबत घाट्यांनी आवडनिवड अशी काहीच ठेवली नाही. याचा एक दुष्परिणाम असा झाला की त्यांची काही चांगली पुस्तके सामान्य प्रकाशकांनी वाईट रीतीने काढली आणि काही पुस्तके तर अननुभवी हाती पडल्यामुळे वाचकांपर्यंत धड पोहोचूही शकली नाहीत. उदाहरण म्हणून 'दीपशिखा' या त्यांच्या पुस्तकाकडे अंगुलिनिर्देश करता येईल. विज्ञान व विज्ञानविषयक संशोधन ही आता केवळ पुरुषांची मक्तेदारी नसून अनेक स्त्रीसंशोधक आपल्या प्रज्ञेप्रतिभेनिशी विज्ञानक्षेत्रात सर्वस्व ओतून कार्य करीत आहेत, हे सांगणारे हे चांगले पुस्तक वाचकांपर्यंत पोहोचू शकले नाही, हे दुर्दैव आहे. घाटे आपल्या पुस्तकनिर्मितीची अशी योजना किंवा आखणी करीत नाहीत. याचा व्हायचा तो परिणाम त्यांच्या शैलीवर होतोच. मध्येच त्यांची लेखनशैली खडबडीत किंवा राठ म्हणावी अशी होते. प्रसंगवशात त्यांना वेगाने व घाईगर्दीने लिहावे लागते आणि आपल्या संपादक मित्रांच्या किंवा प्रकाशक मित्रांच्या मागणीनुसार ते घाईने पुस्तके तयार करून देतात, हेही माझ्यासारख्यांना माहिती आहे. उदाहरणार्थ, केवळ कादंबऱ्याच प्रकाशित करणाऱ्या एका संपादकांच्या अंकाचे प्रकाशन अडून राहिले व मित्रकार्य म्हणून त्याला अडचणीतून सोडवायला हवे, यासाठी घाट्यांनी आपली 'कळसूत्री' ही विज्ञान-कादंबरी त्याला केवळ दोन दिवसांत लिहून दिली. पण हीच 'कळसूत्री' वाचताना असे

जाणवत राहते, की ही कादंबरी जर लेखकाने मन:पूर्वकतेने, नियोजनबद्ध पद्धतीने लिहिली असती तर तिच्या गुणवत्तेत आणखी भर पडली असती. या 'कळसूत्री' च्या अगदी उलट 'निसर्गपुत्र' या पुस्तकाची स्थिती आहे. ॲड्रियन बोशर यांचे चरित्र समाविष्ट असलेले हे पुस्तक वास्तविक अनुवादित आहे, स्वतंत्र नाही. परंतु हा अनुवाद घाटे यांनी कमालीच्या मन:पूर्वकतेने व आपली सर्व भाषिक क्षमता पणाला लावून केलेला असल्याने त्याला स्वतंत्र कलाकृतीचाच दर्जा आलेला आहे.

निरंजन घाटे हे नाव मराठीच्या प्रांतात चांगलेच सुस्थिर झालेले आहे. ही किमया घाटे यांच्या स्वत:च्या लेखनाने केलेली आहे. जाता जाता एक मौजेची पण महत्त्वाची गोष्ट सांगावीशी वाटते. विज्ञान कथालेखक सुबोध जावडेकर यांनी आपल्या एका कथेतील एका पात्राला चक्क निरंजन घाटे यांचेच व्यक्तित्व बहाल केले आहे. जावडेकरांच्या या कथेतील पात्राचे नाव आहे' 'तल्लख निरंजन'. तात्पर्य निरंजन घाटे हे नाव अगोदर म्हटल्याप्रमाणे मराठी पुस्तक जगतात सुस्थिर तर झालेलेच आहे, पण विज्ञानाच्या परिभाषेत बोलायचे झाले तर ते नाव आत भूस्थिरदेखील झालेले आहे. निरंजन घाटे यांना मराठी वाचकांच्या वतीने हार्दिक शुभेच्छा !

४/९, अर्चनानगर, गणेशनगरजवळ, पुणे - ४११०३८. (दूरभाष - ५४४८५०३)

❑ ❑



प्रा. न. र. फाटक स्मृति-प्रतिष्ठान, मुंबई यांच्या तर्फे दर तीन वर्षांनी म. सा. परिषद, पुणे प्राच्यविद्या, इतिहास / चरित्र, संतवाङ्मय या ज्ञानक्षेत्रात महनीय कामगिरी केलेल्या लेखकास १२००० रु.चा पुरस्कार देते.

कै. न. र. फाटक यांचा जन्मदिन १५ एप्रिल हा आहे. त्या दिवशी तो देण्यात यावा अशी अपेक्षा 'प्रतिष्ठान' चे विश्वस्त प्रा. श्री. पु. भागवत यांच्या पत्रात आहे. त्याप्रमाणे या वर्षी म्हणजे १५ एप्रिल २००१ रोजी ख्यातनाम इतिहासकार प्रा. सदाशिव आठवले यांना तो देण्यात आला. कार्यक्रम समारंभाने साजरा व्हायला हवा होता पण श्री. आठवले यांच्या प्रकृति-अस्वास्थामुळे तो तसा होऊ शकला नाही.

परिषदेचे पदाधिकारी कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, कोषाध्यक्ष श्री. रत्नाकर कुलकर्णी आणि प्रमुख कार्यवाह श्री. ह. ल. निपुणगे हे त्या दिवशी प्रा. आठवले यांच्या घरी गेले. आणि नियोजित अध्यक्ष डॉ. अ. रा. कुलकर्णी यांच्या हस्ते त्यांना पुरस्कार प्रदान केला.

○

# हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु ।

○

## रामदासांच्या 'करुणाष्टकांचा' चिकित्सक अभ्यास

(समर्थ रामदासांची करुणाष्टके : डॉ. सुहासिनी इर्लेकर, कल्पना प्रकाशन, नांदेड. पृ. १७३, मूल्य रु. १००/-)

मध्ययुगीन मराठी वाङ्मय हे अनेकविध वाङ्मय प्रकारातून लिहिले गेले आहे. त्यातील 'अभंग', 'आरती', 'गौळण', 'भारूडे', 'स्तोत्र', 'लावणी', 'पोवाडे' अशा काव्यमाध्यमांचा व त्यांच्या वाङ्मयीन स्वरूपासह निवडक उताऱ्यांचा संशोधकांनी केलेला अभ्यास वाचकांसमोर आहे. कित्येक प्रकारांचा अभ्यास अद्यापि व्हावयाचा आहे. 'करुणाष्टक' या संत रामदासांमुळे ख्याती पावलेल्या काव्यप्रकाराचा अभ्यास डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी 'समर्थ रामदासांची करुणाष्टके' या आपल्या पुस्तकात मांडला आहे. डॉ. सुहासिनी इर्लेकर या मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या संशोधक, तशाच समीक्षक आणि कवयित्री म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांच्या या तिन्ही विशेषांचे दर्शन या पुस्तकात घडते.

समर्थ रामदासांचे अन्य वाङ्मय उपदेशपर, व्यवहारवादी, अध्यात्मबोध करणारे आणि बऱ्याच अंशी गद्यप्राय वाटणारे आहे. 'करुणाष्टका'त मात्र त्यांचे तगमगणारे भक्तहृदय प्रकट करणारे, विरहार्ततेने ओथंबलेले कविमन भरून राहिले आहे. प्रत्येक भक्ताच्या जीवनात साधकावस्था ही अत्यंत बिकट असते. परमेश्वरप्राप्तीच्या भावनेने त्याचें मन शंकित होते. 'नामदेव आणि तुकाराम, यांच्या काव्यात त्यांची ही अवस्था तीव्रतेने व्यक्त झाली आहे. 'श्लोक केकावली' हे मोरोपंतांचे काव्य भक्ताच्या जीवनातील या सर्व भावावस्था प्रकट करते. या सर्व कवितांचा विचार केला तर 'करुणाष्टक म्हणजे भक्ताने परमेश्वराला केलेले करुणार्त आत्मनिवेदन' असे म्हणता येईल.

डॉ. इर्लेकर यांनी श्री. शं. श्री. देव यांची 'करुणाष्टक मीमांसा' विस्ताराने दिली आहे. पण श्री. देवांनी समर्थ रामदासांची प्रत्येक कृती ही राष्ट्रकार्याच्या संदर्भात विचारात घेतली आहे. त्यामुळे व्यक्ती, समाज व राष्ट्राला शाश्वत सुखाची प्राप्ती कशी होईल हा विचार 'करुणाष्टके' रचण्याच्या मागे आहे, असे त्यांना वाटते. वास्तविक रामदासांची ही रचना त्यांच्या नाशिकच्या वास्तव्यात, साधकावस्थेत झालेली होती. निवृत्तिवादी विचारांचा प्रभाव या काळात त्यांच्यावर होता. श्रीरामाच्या प्राप्तीसाठी, दर्शनासाठी त्यांचे अंतःकरण व्याकुळ झाले होते. 'अनुदिन अनुतापे तापलो रामराया', 'उदासीन हा काळ कोठे न कंठे',

'तुजवीण रामा मज कंठवेना', 'उदासीन हे वृत्ति कोठे न कंठे' अशा शब्दात त्यांनी आपल्या भावना व्यक्त केल्या आहेत. परंतु बारा वर्षांच्या तपश्चर्येनंतर त्यांची ही वृत्ती पालटली आणि ते राम 'दासा' चे 'समर्थ' रामदास बनले. भावनेचा, विचारांचा जोरकसपणा हे त्यांच्या रचनेचे वैशिष्ट्य असल्यामुळे शैथिल्याकडे ते फारसे लक्ष देत नाहीत. त्यातील उत्कटता मात्र मनास भिडते.

डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी 'पूर्वरंगा'त समर्थ रामदास यांची समकालीन पार्श्वभूमी, संत तुकाराम आणि समर्थ रामदास इ. विषयांची विस्ताराने पण अभ्यासपूर्ण चर्चा केली आहे. 'अंतरंगा'त सतरा निवडक करुणाष्टकांचे सार्थ, सविस्तर विवेचन केले आहे आणि 'उत्तररंगांत' 'करुणाष्टकां'च्या विविध रंगांचे, त्यातील अनेक धागे वेगळे करीत तपशीलवार स्वरूप सांगितले आहे. त्यात 'करुणाष्टके' हे उद्देशिका (ode) काव्य, त्यांची शीर्षके, त्यांची भाषा, त्यातील व्याकरण, विशेष, त्यांची संख्या, भक्त आणि संत या भूमिकांमुळे निर्माण झालेला पेच इ.चा विचार झाला आहे. आणि परिशिष्टात करुणाष्टक आणि कवीची भूमिका, अनुतापाचे कारण, श्रीरामांस केलेली याचना व अन्य विशेष यांची कोष्टकरूपात मांडणी केली आहे.

रामदासांच्या करुणाष्टकांचा विचार करीत असताना डॉ. इर्लेकर यांना स्वाभाविकपणेच श्री. शंकराचार्यांच्या 'अष्टक' रचनांचे स्मरण झाले आहे. पण शंकराचार्यांची 'अष्टके' ही स्तोत्ररूपातील आहेत, तर रामदासांची 'करुणाष्टके' आंतरिक उमाळ्याने भावगर्भ स्वरूपात साकारली आहेत. 'अष्टक' हे आठ श्लोकांचे असावे, अशी अपेक्षा असली तरी रामदासांची करुणाष्टके पंचक, दशक या संख्येतही लिहिली गेली आहेत. डॉ. सुहासिनी इर्लेकर यांनी करुणागीते, करुणाष्टके आणि करुणापर गीते यांतील 'करुणा' ही संज्ञा समान मानून त्यांचा विचार केला आहे. 'मराठी संत काव्यातील अर्ध्याहून अधिक भाग अशा प्रकारच्या करुणापर अभंगरचनांनी वा पदरचनांनी व्यापलेला दिसतो.' असे मत व्यक्त करून त्यांनी या साऱ्यांचा करुणा भावनेवर अधिष्टित म्हणून त्यांचा एकत्र विचार केला आहे. डॉ. इर्लेकरांनी करुणाष्टक या काव्यप्रकाराची जोड अन्य अनेक काव्यरचना आणि विषयांशी दिल्याने त्याचे वाङ्मयीन एकसंध रूप विविधांगी झाले आहे.

या पुस्तकास डॉ. इर्लेकर यांनी लिहिलेली ५८ पृष्ठांची प्रस्तावना हे त्याचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. समर्थ रामदास आणि संत तुकाराम या उभयतांचे व्यक्तिमत्त्व, जीवनविषयक धारणा व कार्य यांची त्यांनी केलेली चिकित्सा मोलाची आहे. राष्ट्राच्या उद्धारासाठी प्रयत्नशील असणाऱ्या रामदासांनी लिहिलेल्या राष्ट्रीय करुणाष्टकांचाही त्यांनी विचार केला आहे. पुस्तकाच्या 'पूर्वरंगा'त विवेचक प्रस्तावना, 'अंतरंगा'त सतरा करुणाष्टकांचे सविस्तर रसपूर्ण विवेचन आणि 'उत्तररंगा'त त्यांच्या काव्यंगांचा विचार करण्यात आला आहे. संख्येने अल्प असलेल्या 'करुणाष्टकां'च्या निमित्ताने डॉ. सुहासिनी

इर्लेकर यांनी त्यांचा अनेक अंगांनी केलेला विचार महत्त्वपूर्ण आहे. मध्ययुगीन मराठीतील अशा अन्य वाङ्मयप्रकारांचा अभ्यास करण्याची प्रेरणा आणि दिशा त्यामुळे मिळेल.

- डॉ. वसंत स. जोशी

१२४, पथ क्र. ९, महात्मा गृहरचना संस्था, कोथरूड, पुणे-२९.



## चित्रदर्शी बालगीते : घाटातले आभाळ

(घाटातले आभाळ - मेधा सिधये, मंजुल प्रकाशन, २९८ शनिवार, पुणे ४११ ०३०. मूल्य रु. २०/-)

मॉडर्न महाविद्यालयातील मराठीच्या प्राध्यापिका सौ. मेधा सिधये यांचा 'घाटातले आभाळ' हा बालगीत-संग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. लहानग्या मुलामुलींच्या मनाची जाण असणं, त्यांच्या आवडीनिवडी, खेळ, खोड्या इ. ची सूक्ष्म माहिती असणं आणि या सर्वांचा उपयोग करून बालसृष्टीचं निरागस दर्शन घडविणं याला जातिवंत 'बाल' कवित्व अंगी असावं लागतं. सौ. मेधाताईंच्या अंगी असं कवित्व उत्कटतेनं आहे याची प्रचीति 'घाटातले आभाळ' हा त्यांचा संग्रह वाचून रसिकांना नक्की येईल असा विश्वास वाटतो.

प्रस्तुत संग्रहात एकूण अठ्ठावीस बालगीतं आहेत. धरती, आकाश, ढगाआड, लपलेला चंद्र, चांदण्या, निसर्ग, नद्यानिर्झर, फळंफुलं, समुद्र, आईवडील, आजोवा-आजी, सवंगडी ही सारी बालसृष्टी संग्रहातील विविध गीतांतून दृष्यमान होते व ती पाहून रम्य त्या बालपणाची आठवण येते. हा संग्रह कवयित्रीने आपल्या 'मुग्धा' नामक कन्येला अर्पण केला आहे. तो सारा मुग्धपणा संग्रहात नाट्यपूर्ण आणि चित्रदर्शी शैलीत मुखर झाल्याचं जाणवतं आणि मोठा आनंद होतो. निरागस, मजेशीर असं या आनंदाचं स्वरूप आहे. 'कौशल्य सारे रचनेत आहे' याचा प्रत्यय संग्रहातील अनेक गीतांचे जे मुखडे किंवा आरंभ आहेत त्यावरून चांगला येतो. उदा. 'सरी गं सरी येऊन जा, इंद्रधनूला खुलवून जा' किंवा 'गणपती बाप्पा! गणपती बाप्पा वर्षातून एकदाच तुम्ही का हो येता ?'

फुलपाखरू, छपरावरची मांजरी, मासोळीचं स्वप्न, सवंगडी, ढगांची जादू, एकटे आजोवा, घाटातले आभाळ, शेवटची तृप्ती या गीतांना आणि मलपृष्ठावरील मजकुराला कोणीही वत्सल रसिक पसंतीची टाळी देईल. काही गीतं विनोदी ढंगानं लिहिली आहेत. काही निसर्ग वर्णनपर आहेत, तर काही मोठी आशयसंपन्न आहेत. 'हरवलेलं बालपण' आणि 'जादूचे झरे' या दोन कवितांत अभ्यासाच्या नि पुस्तकांच्या ओझ्याखाली बालमनं कशी चुरगाळली जातात हा आशय सूचित होतो. शिक्षणतज्ज्ञांना तो अंतर्मुख करील. 'एकटे आजोबा' मधील एकाकीपणाची जाणीव हृदयस्पर्शी आहे. 'माझी एकादशी' सारखं

गीत हसू फुटावं अशा विनोदी ढंगाने रचलेलं आहे. 'मैतरिणी गं', 'मामाच्या गावात', 'आवतन' या गीतांमधून ग्रामीण वातावरण नि बोलीचा ढंग चांगला व्यक्त झाला आहे.

'मासोळीचं स्वप्न" हे संग्रहातील सर्वोकृष्ट रम्य नि हुरहूर लावणारं गीत म्हणावं लागेल. सव्वीसावी 'श्रीमंती' आणि 'अखेरची तृप्ती' या दोन कविता आशयसंपन्न असून मुलामुलींवर उत्तम संस्कार घडविणाऱ्या आहेत. काही कल्पना आणि प्रतिमा यांची पुनरुक्ती करणाऱ्या दोनतीन कविता संग्रहात भेटतात. तसेच शब्दांच्या ओढाताणीमुळे एकदोन कवितांचा शेवट गद्यप्राय झाला आहे. पण असे किरकोळ दोष वगळता डॉ. मेधा सिधये यांची 'घाटातली' बालगीतं नाट्यपूर्ण, सफाईदार, चित्रदर्शी आहेत, यात शंका नाही. तांबे, ग. ह. पाटील, गोपीनाथ तळवलकर यांच्या बालगीतांची याद यावी असा हा सचित्र संग्रह रसिकांचे हाती दिल्यावद्दल कवयित्री आणि प्रकाशिका या दोघीचे मनोभावे अभिनंदन.

- म. श्री. दीक्षित

८६५, सदाशिव पेठ, पुणे- ४११ ०३०.



## आहे मनोहर तरी 'धुके धूसर भासते !'

(धुके (चार दीर्घ कथा) श्रीरंग विष्णु जोशी, आर्यता प्रकाशन, सांगली १९९९, पृ. २५ + १२५ किंमत रु. १००/-)

'धुके' ही प्रतिमा वाङ्मय-व्यवहारात तऱ्हेतऱ्हेने उपयोजिली गेली आहे. धुक्यात हरवली वाट, संशयाचे धुके, धुके आणि शिल्प अशा विविध संदर्भात हे धुके पसरलेले आहे.

श्रीरंग विष्णु जोशी यांनी अत्यंत अर्थपूर्णतेने 'धुके' प्रतिमेचा वापर करून प्राचीन आर्ष महाकाव्ये, रामायण आणि महाभारत यामधील काही व्यक्तिरेखांतील संबंधांचे आणि त्यांच्या वाट्याला आलेल्या प्राक्तनाचे पुनर्कथन 'धुके' या संग्रहातील चार दीर्घ कथांमधून केले आहे.

कविता आणि ललितगद्य लेखनामुळे परिचित झालेले श्रीरंग विष्णु जोशी मोजके अन् संस्मरणीय लिहितात, हे सुजाण वाचक जाणून होते. 'आईच्या कविता,' ब्रह्माचा खांब' या कवितासंग्रहांमधून आणि 'अनुदिनि अनुतापे', 'अदृष्टाची सावली' या आत्मपर ललितगद्य लेखनातून त्यांच्या लेखणीचे बळ आणि अनुभवकथनातील नितळपणा लक्षात राहिला होता. पुढे काही दिवाळी अंकांमधून त्यांच्या दीर्घ कथा वाचनात आल्यावर असे जाणवू लागले होते की श्रीरंग विष्णूंच्या लेखणीने आता अधिक प्रगल्भ वळण स्वीकारले आहे. यावर्षी प्रकाशित झालेल्या त्यांच्या 'धुके' कथासंग्रहाने आता त्याची साक्ष पटवली आहे.



अनुक्रमणिका






'धुके' ही कथा रामायणातील भूमिकन्या सीतेवर लिहिली गेली आहे. भूमीने उदरात घेतल्यानंतर 'रामायणातील सीतेची कहाणी संपते. तिच्याबद्दल शोकविव्हलता प्रकट होत राहण्यापलिकडे अधिक काही समजत नाही. तिचे विशुद्ध चारित्र्य आणि तिने सोसलेला वनवास हाच सर्वांच्या कणवेचा विषय असतो. पण दोन पुत्रांना जन्म देऊन त्यांचे संगोपन केल्यावर अखेरी धरतीमध्ये गडप होतानाची तिची मनःस्थिती काय असेल, तिचे आयुष्य तिथेच संपले की काही चमत्कार घडून ती जिवंत राहिली असेल व लाक्षणिक अर्थाने भूमिगत जीवन काही काळ जगली असेल अशी कल्पना कोणी करीत नाही. श्रीरंग विष्णूंनी तिच्या तशा 'भूमिगत' असण्याची कल्पना ग्राह्य मानून तिच्या मनःस्थितीचा वेध घेण्याचा प्रयत्न 'धुके' या कथेत केला आहे. एखाद्या शोकात्मिकेतील नायिकेला अनेक मूलभूत प्रश्नांच्या आग्यामोहळाने डसावे, तसे नियती आणि मानवी जीवन, माणसामाणसांतील नातेसंबंध याबद्दलचे प्रश्न सीतेला सतावत राहतात. सारे पाश आता तुटून गेले आहेत. ना राजकन्या, ना राणी, ना राजमाता असे कोणतेच भावबंध बाळगण्याचे कारण तिला उरत नाही. निःसंग अवस्थेत चिंतन सुरू राहते. तरीही त्या भासमान अवस्थेत तिला वृद्धा झालेली अहिल्या भेटते आणि तिचाच शोध घेत निघालेला, व्याकुळ झालेला परमभक्त हनुमान भेटतो, अशी कल्पना करून लेखकाने त्यांच्याशी झालेल्या सीतेच्या संवादांमधून चिंतनपर कथा फुलवली आहे. प्रौढ भाषा आणि समाजमुक्त सृष्टिचित्रे दिमतीला धरून जीवनदर्शनाचा एक नवा ऐवज प्रकट केला आहे.

'महाप्रस्थान' ही महाभारतातील कथा अधिक ऐसपैस आहे. मानवी नातेसंबंधांचा अधिक मोठा आवाका पत्करला आहे. पाच पांडव, द्रौपदी आणि कुत्रा सारमेय यांच्या अखेरच्या प्रवासाची वाटचाल नव्या दिशेने चित्रित केली आहे. मृत्यूची अटळता आणि त्याच्या उंबरठ्यात असतानाही जागृत राहणारे स्व-प्रेम, भोगलेले भोग आणि घडलेले प्रमाद, जिवलगांच्या गोतावळ्यात राहूनही न उजळलेले कानेकोपरे अशा अनेक स्तरांवर श्रीरंग विष्णूंनी या कथेचा गाभा अर्थसघन केला आहे. द्रौपदीच्या काळ्याभोर कचपाशातून चांदणीसारखे तेजस्वी रत्न बाहेर पडते, या काल्पनिक प्रसंगाचा आणि भीमसेनाने स्वतःची प्रिय गदा जलार्पण केली, तो प्रसंग या कथेमध्ये अत्यंत वेधक ठरले आहेत. 'देवांच्या अस्तित्वाविषयी मानवी मन सदैव साशंक राहील' अशी शापवाणी उच्चारून स्वर्गाच्या दारात ओक्साबोक्शी रडणारा युधिष्ठिर मनामधून लवकर पुसला जात नाही, हे या कथेचे एक बलस्थान आहे.

'यक्ष' या कथेचे वळण काहीसे रोमँटिक आहे. सत्-असत्, भास-आभास यांच्या धाग्यादोऱ्यांनी कथा गुंफली आहे. मंतरलेले तळे, मरण आणि मूर्च्छा, शाप-उःशाप या घटकांची मातब्बरी अधिक आहे. स्वतःला सर्वश्रेष्ठ समजणाऱ्या युधिष्ठिराचा अहंभाव डळमळीत करण्याचे काम या कथेतील महायक्ष करतो, तसेच स्वकन्येला प्रिय असलेल्या

यक्षाची अ-नैतिकता उघड करून, त्याला शाप देतो. भावी काळात रचल्या गेलेल्या 'मेघदूत' या काव्याचा तो पूर्वावतार असल्याचे लेखकाने सूचित करून त्याकडे पाहण्याचे नवे सूचन व्यक्त केले आहे. मात्र कथेचे प्रधान आशयसूत्र काहीसे संदिग्ध राहिले आहे.

'अस्त' या चौथ्या कथेचे आशयसूत्र श्रीकृष्ण आणि अश्वत्थामाच्या संवादामधून उलगडले आहे. शापित अश्वत्थामा या कथेत परखड बोलतो. श्रीकृष्णाच्या वर्तनावर भाष्य करतो. भविष्यकालीन शिलालेख वाचण्याची आपली अद्भुत शक्ती सांगता सांगता श्रीकृष्ण-द्रौपदी, अर्जुन-सत्यभामा यांच्याबद्दल विपरीत बोलतो. आयुष्याच्या अखेरी कृष्णाची सर्व पुण्याई संपून गेल्याचे दाहक वास्तव स्पष्ट करतो. स्वतःच्या चिरंजीवपणाचा अभिमान मिरवीत निघून जातो. इकडे पारध्याचा बाण लागून श्रीकृष्ण अखेरचा श्वास घेतो.

या चार कथांमधून श्रीरंग विष्णु यांनी जन्म आणि मृत्यू या दोन तीरांमधून प्रवाहित होणाऱ्या मानवी जीवनाचा आणि तदन्तर्गत काही मूल्यांचा, शाश्वत प्रश्नांचा चिंतनगर्भ शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. रामायण-महाभारतातील व्यक्तींकडे माणूस म्हणून पाहिले आहे. त्यांच्या जीवनातील अद्भुतता सर्वस्वी नाकारलेली नाही, पण त्यांच्या मनःस्पंदनावर लक्ष केंद्रित केले आहे.

दृष्टांत कथांची एक परंपरा मराठी कथेने समृद्ध केलेली आहे. प्राचीन कहाण्यांचा संदर्भ बाजूस ठेवला आणि खांडेकरांच्या पिढीने रूढ व लोकप्रिय केलेल्या स्थूल रूपक कथाही सांकेतिक आणि गणिती म्हणून नजरेआड केल्या तरी प्रभाकर पाध्ये यांच्या 'त्रिसूपर्ण' मधील दृष्टांत कथांचा बाज किंवा 'काजळमाया' पासून जी. ए. कुलकर्णी यांनी अनेक दीर्घ कथांमधून दाखविलेला डोहकाळिमाचा अंतःप्रवाह हे चिंतनगर्भतेच्या अंगाने लक्षात घ्यावे लागतात. अर्थात् श्रीरंग विष्णूंच्या कथालेखनाची त्या पूर्वसूरींशी तुलना करण्याचा मोह टाळला पाहिजे. कारण प्रत्येकाची प्रकृती जशी वेगळी असते तसे बृहद् महाकाव्यांचे आकलनही भिन्न पातळीवरचे असते. 'धुके' च्या लेखकाचा बाज काव्यात्मतेकडे आधिक झुकणारा आहे. त्यांचा भावप्रत्यय चिंतनाच्या पातळीपर्यंत पोचतो, पण तदन्तर्गत सर्वच व्यामिश्र धागे उलगडण्याचा सोस लेखक बाळगत नाहीत. कदाचित समस्त लेखन तर्कानुगामी होण्याचा धोका वाटत असावा अथवा धुक्यातील धूसर दर्शन-तारतम्यच त्याला सूचक अन् कलात्मक वाटत असावे. युधिष्ठिराची आपल्या भावंडांबद्दलची धारणा नेमकी कोणती आहे याचे ठाम उत्तर 'यक्ष' आणि 'महाप्रस्थान' या दोन्ही कथा वाचून मिळत नाही; याचे कारण ही तर्कप्रधानता टाळण्यामध्ये असावे. कारण काहीही असो, श्रीरंग विष्णु जोशी यांची शैलीसंपन्न श्रीमंत शब्दकळा हे या कथांचे प्रभावी वाचनमूल्य ठरले आहे. त्या बळावर वाचक आकृष्ट होणार आहे. आधीच व्यक्तिरेखा आणि वातावरण परिचित असणाऱ्या वाचकाला भरजरी शामियान्यामधून फेरफटका मारण्यास का आवडणार नाही? अर्पणपत्रिकेनंतर लेखकाने जो संस्कृत श्लोक दिला आहे त्यामधील

धुक्याचा लोट आणि भ्रमण या शब्दयोजना त्याची लेखनप्रकृती सूचित करणाऱ्या आहेत, असे वाटते. सूर्यप्रकाशामुळे धुक्याचा पडदा छेदला जाऊन, आसमंताचे लख्ख दर्शन घडावयास हवे, ही अपेक्षा शंभर टक्के पूर्ण होणार नाही, पण अंतराळातील अद्‌भुताचा वेध लागणे एवढे यश का थोडे आहे?

जाणत्यांना व्यासंगाच्या क्षितिजापर्यंत भिडवण्याचे काम डॉ. निशिकांत मिरजकर यांच्या प्रस्तावनेने केलेले आहे. निखळ दृष्टी प्राप्त होण्यासाठी ती फार मोलाची आहे.

मुखपृष्ठापासून मोहरदार छपाईपर्यंत सर्वत्र अभिरुचिसंपन्नता ठेवल्यावद्दल सांगलीच्या आर्यता प्रकाशनाला 'धुके' च्या निमित्ताने धन्यंवाद द्यावयास हवेत. आगे बढो !


- डॉ. सुरेश जोशी

मधली आळी, देवरूख ४१५ ८०४




मराठी ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांची समाधी कमला नेहरू पार्क, पुणे - ४ येथे आहे. दरम्यानच्या काळात तिची बरीच हेळसांड झालेली असल्याने दुरुस्तीची गरज आहे. १० एप्रिल २००१ या त्यांच्या स्मृतिदिनी तिथे जमलेल्या साहित्य-प्रेमींमध्ये यावद्दल चर्चा झाली. उत्स्फूर्तपणे काही देणग्या जाहीर झाल्या. - त्या पुढीलप्रमाणे म. सा. प. या कामासाठी आणखी देणग्यांच्या प्रतीक्षेत आहे.

| | |
|---|---|
| श्री. गो. रा. ताम्हाणे - पुणे | रु. ५०००.०० |
| श्री. बा. न. देशमुख - पुणे | रु. ३०००.०० |
| श्री. वा. के. लेले - पुणे | रु. ३००.०० |
| श्री. योगेश्वर भट - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. म. कृ. लेले - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. हे. वि. इनामदार - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. कृ. ना. कुळकर्णी - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. गो. भा. मराठे - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. पंडितराव गानू - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. वा. सी. काणे - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. चंद्रकांत रघुनाथ देशपांडे - पुणे | रु. २५१.०० |
| श्री. एम्. एस्. गोडबोले - पुणे | रु. १०१.०० |
| श्री. व. मं. सिरसीकर - पुणे | रु. १०१.०० |
| श्री. वा. ह. जोशी - पुणे | रु. १०१.०० |
| श्री. शरद रणदिवे - पुणे | रु. १००.०० |

○

# मागोवा - 'स्वामी - एक शोध'चा

('स्वामी : एक शोध' - संपादन व प्रस्तावना प्रा. डॉ. मीरा घांडगे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे - ४११ ०३०.)

## १. आमुख

'स्वामी' ही कै. रणजित देसाईंची लोकप्रिय आणि गाजलेली कादंबरी. लोकप्रिय अशासाठी की १९६२ ते १९८१ पर्यंत या कादंबरीच्या १० आवृत्त्या (सध्या २१ वी आवृत्ती) निघाल्या आणि गाजलेली अशासाठी की रसिक आणि विद्वानांनी या कादंबरीवर साधकबाधक परीक्षणे लिहिली. अशा एकवीस परीक्षण लेखांचे संकलन साक्षेपी विदुषी डॉ. मीरा घांडगे यांनी सिद्ध केले. या संग्रहाला त्यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना जोडली आहे. शेवटी 'स्वामी'ची निर्मितीप्रक्रिया, रणजित देसाईंची स्वामीच्या संदर्भात मुलाखत आणि रणजित देसाईंविषयीचे लेख ही परिशिष्टेही जोडली आहेत. साहजिकच ग्रंथाचा मागोवा घेताना मूळ स्वामी कादंबरी, त्यावरील टीकालेख आणि या टीकालेखांच्या संकलनाला जोडलेली डॉ. मीरा घांडगे यांची प्रस्तावना अशा तीन स्तरांवर घ्यावा लागेल हे उघड आहे. लोकप्रियता लाभलेल्या साहित्यकृतीविषयी साधकबाधक लिहिणे तसे फारसे फलदायी नसते. सामान्य वाचक त्या साहित्यकृतीच्या मोहिनीत गुरफटलेला असतो. विचक्षण विद्वान 'तिच्या लोकप्रियते'च्या दबावाने परखडपणे लिहायला अंमळ अनमानच करतो.

## २. अभ्यासपूर्ण कृती

'स्वामी' ही ऐतिहासिक कादंबरी आहे. ती लिहिताना आपण इतिहासाचा सखोल अभ्यास केला आहे, असा देसाई यांचा दावा आहे. (स्वामी-ऋण पृ. ९-१०). कादंबरीच्या शेवटी दिलेली ग्रंथांची यादी पाहिली की हा दावा किती पोकळ आहे, ते तेव्हाच लक्षात येते. यात फारतर दोन-तीन ग्रंथ दुर्मिळ आहेत. यात टॉडच्या Annals and Antiquities of Rajasthan या ग्रंथराजाचा समावेश आहे. पण संपूर्ण कादंबरीत या ग्रंथाचा कुठे उपयोग झाल्याचे जाणवत नाही. गो. स. सरदेसाई यांच्या 'मराठी रियासती' मधील 'निग्राहक माधवराव', त्यांचेच New History of the Marathas, Vol. III, आणि इतर दोन-तीन किरकोळ ग्रंथ सोडल्यास त्या यादीतील इतर ग्रंथांचे प्रयोजनच जाणवत नाही. बखरी, दप्तरे, घराण्यांचे इतिहास सरदेसाई, शेजवलकर आदींनी उपयोगात आणले आहेत. देवाजीपंतांचे बुद्धिवळ प्रकरण, गंगाधर यशवंत चंद्रचूड यांना शासन,

विष्णुभट शिरपेच प्रकरण, इच्छारामाला खंजीर (कुरुंदकरांच्या मते तलवार; शोध, पृ. ११९.) मागणे, रामशास्त्री प्रभुणे यांनी माधवरावांच्या कर्मकांडावर आक्षेप घेणे आदि कथा (Anecdotes) प्रसिद्ध आहेत. गो. स. सरदेसाई यांनीही त्या नोंदविल्या आहेत. आता इतकी सगळी सामग्री सिद्ध असता रणजित देसाईंनी कोणता अफाट अभ्यास केला (प्र. के. अत्रे, शोध, पृ. ४०) हेच कळेनासे होते. ग्रंथाच्या यादीने सामान्य वाचक दिपून जातात; पण चांगले समीक्षकही कसे चकतात याची काही उदाहरणे देतो.

'स्वामी' कादंबरीच्या प्रारंभी एक शेर दिला आहे, तो असा -

*माँगा करें अब से दुआ हिजरे-यार की*

*आखिर तो दुश्मनी है असर को दुआ के साथ*

डॉ. पंडित आवळीकरांनी स्वामींचे परीक्षण लिहिताना हा शेर मिर्जा गालिबच्या नावे टाकला आहे. (शोध पृ. ९४). त्याचा अर्थही अगदीच आडनिडा दिला आहे. माँगा करें (गे) अशी दुरुस्तीही सुचविली आहे. हा शेर प्रख्यात कवी मोमीन यांचा आहे. उर्दू पार्शियनचे गाढे अभ्यासक सेतुमाधवराव पगडी यांनी माँगा करे हाच पाठ दिला आहे. (उर्दू काव्याचा परिचय, पृ. ३१९) तो अधिक योग्य वाटतो.

स्वतः रणजित देसाईंनीच 'श्रीमान योगी' या कादंबरीच्या पहिल्या आवृत्तीत 'खुदी को कर इतना बुलंद' या डॉ. महंमद इक्बाल (मृत्यू २१ एप्रिल १९३८) यांच्या ओळी मिर्जा राजे जयसिंह यांच्या तोंडी घातल्या आहेत. (श्रीमान योगी, प्रथम खंड, पृ. ४४६) असाच प्रसंग मोरेश्वर या भटाविषयी आहे. माधवराव अगदी पहाटेच्या काळोख्या वेळी (स्वामी पृ. ३८) त्याचे गायन ऐकतात. तो 'बाजो रे बाजो मंदरवा' ही शुद्ध कल्याण रागातील वंदिश गात असतो. शुद्धकल्याण हा रात्रीच्या प्रथम प्रहरातील राग आहे, असे जाणकारांचे मत आहे. त्यातही मुद्राराक्षसाने बा जोरे असा भंग करून गंमत आणली आहे. अशाच गमती मग 'स्वामी'च्या वळणावर गेलेल्या इतर ऐतिहासिक कादंबऱ्यांनीही केल्या. छत्रसालाने मस्तानीला 'डेलियाचे फूल' म्हणणे, रँपर्ट (Rampart = तटवंदी) याचे रामपार्ट असे धर्मांतर होणे, पेशवाईत पंचमस्तंभी कारवाया (Fifth Columnist) होणे, असे किती प्रकार सांगावेत!

## ३. इतिहासाशी ईमान

स्वामी ही ऐतिहासिक कादंबरी आहे. ती इतिहासाला प्रमाण राखून लिहिली गेली आहे, असा डॉ. मीरा घांडगे यांचा अभिप्राय आहे (शोध, पृ. ४). असेच अभिप्राय स. गं. मालशे (शोध, पृ. ३३), प्र. के. अत्रे (पृ. ३९), वि. भा. शहा (पृ. १५६, १६१) आदींनी व्यक्त केले आहेत. स्वतः रणजित देसाईंची प्रतिज्ञा इतिहासाशी प्रामाणिक राहून

'क्वीन ऑफ स्कॉट' वा 'मेरी अँटोनेट' सारखी कादंबरी लिहावयाची आहे. (शोध, पृ. १६७). मूळ स्वामी कादंबरी वाचताना देसाई यांच्या या प्रतिज्ञेची वा समीक्षकांच्या उपर्युक्त अभिप्रायांची काय आवश्यकता होती हेच कळत नाही. कारण रणजित देसाई यांनी 'स्वामी'च्या शेवटी माधवरावांच्या जीवनाचा कालपटच दिला आहे. आणि त्याच क्रमाने प्रसंग वर्णिले आहेत, त्यामुळे ही ऐतिहासिक कादंबरी ठरतच नाही. ही आहे चरित्रात्मक कादंबरी. स्वतः रणजित देसाईसुद्धा इतिहासाशी ईमान वगैरे राखण्याच्या लांबरुंद गोष्टी सांगत असतानाच आपण माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाने कसे भारावून गेलो, भावविव्हल झालो याचेही पाल्हाळ लावतातच (शोध, पृ. २७२, २७३). समीक्षकांनाही हे जाणवले आहे. प्रख्यात समीक्षक दि. के. बेडेकर यांना तर ही संवादरूप बखर वाटते (शोध, पृ. ५८). माधवराव वल्लाळ ऊर्फ थोरले माधवराव पेशवे यांच्या कारकिर्दीचं आणि कर्तबगारीचं चित्र 'स्वामी' या कादंबरीत रेखाटण्यात आले आहे, असे श्री. श्री. मा. कुलकर्णी नोंदवितात (शोध, पृ. ६०). माधवरावाचे व्यक्तित्व (शोध, पृ. ७०), माधवरावांच्या जीवनाचा उदात्त पण शोकात्म घाट (शोध, पृ. १११), एक महान व्यक्तिमत्त्व (शोध, पृ. ११६) असे म्हणत म्हणत समीक्षकांनी ही माधवरावांची चरितकहाणी आहे असेच सुचविले आहे.

## ४ 'स्वामी'चे पोत

माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाने पूर्णपणे झपाटले गेलेले रणजित देसाई या चरितकहाणीरूपी कादंवरीची रचना कशी करणार हे सांगायला कुणा होराभूषण म्हापणकरांची गरज नव्हतीच. माधवराव हे आदर्श प्रशासक, निग्राहक, शिस्तप्रिय असा इतिहासाचा दाखला होताच. आता कादंबरीत सरळधोपटपणे माधवरावांचे चित्रण येणे अपरिहार्यच होते. ते पार्वतीवाईसंवंधी बोलतात आणि भाऊसाहेबांचा तोतया तडक नांगी टाकतो. ते जानोजी भोसले, मल्हारराव होळकर यांच्याशी वोलतात आणि ते विरघळतात, ते मोती खरेदी करीत नाहीत म्हणून रमाबाईही करीत नाहीत, असं अगदी सहज घडत जातं. मग सगळ्या मराठमंडळाचे सरळसरळ दोन व्यूह पडतात. माधवराव, रमावाई, रामशास्त्री, नाना असा एक व्यूह आहे. राघोबा, बापू, रायरीकर, विठ्ठल सुंदर असा दुसरा व्यूह आहे. (शोध, पृ. १२६). पण ही सगळी पात्रे माधवरावांभोवती फिरत आहेत. (तत्रैव). ती सारी त्यांच्याच यशाची आणि कीर्तीची प्रभावळ मात्र होतात.

असा आराखडा एकदा तयार झाला की मग उरते ते चटकदार संवाद लिहिणे. किंवा काही प्रसंगाला नाट्यरूप देणे. उदाहरणार्थ माधवरावांच्या अंगरख्यावर राघोबांच्या जोड्यांचे डाग पडणे, चिंकाऱ्याच्या शिकारीचा प्रसंग, नारायणरावांनी घेतलेली हरणाची पिलं, रमावाईंचा अत्तराचा आणि विड्यांचा प्रसंग. हे सर्व सामान्य वाचकांना, रसिकांना आणि

समीक्षकांनाही आवडते. स्वामी ही नाट्यमय प्रसंगांची वीण आहे, असे जवळजवळ सर्वच समीक्षक नोंदवतात. हेच लेखनतंत्र, हीच 'वीण' फडके, खांडेकर, दांडेकर यांच्या साहित्यसृजनाची आहे. क्वचित श्री. मा. कुलकर्णी (शोध, पृ. ६४) इथं माधवरावांच्या चित्रणात मनोविश्लेषणाचा उपयोग नाही असं म्हणतात, तर इथे माधवरावांच्या मनाचा फारसा विकासच होत नाही, असा मार्मिक अभिप्राय कुरुंदकर देतात (शोध, पृ. १२१).

अशी ही पूर्णतः व्यक्तिप्रधान चरितकहाणी असल्यामुळे इथे पेशवाई केवळ पार्श्वभूमीचा पडदा म्हणून येते. दरबाराची आणि मिरवणुकांची वर्णनं एक-दोन ठिकाणी येतात. पानिपतचा पराभव हा मराठ्यांच्या सत्तेवर झालेला फार मोठा आघात. सूर्य माध्यान्ही ऐन तेजाने तळपत असताच ग्रहण लागावे तसा प्रकार. या पराभवाने मराठे खचले. कर्जबाजारी झाले. पानिपतावर एक कर्तबगार पिढीच गारद झाली. यानंतर मागे उरली ती माणसे बापू, मोरोबा, विठ्ठल शिवदेव अशी होती. यांतील काही कर्तबगार होती, काही नव्हती. पण आता पेशव्यांना माणसांची गरज पडली. म्हणून सरदार मुजोर झाले. आधीच असलेले देशस्थ-कोकणस्थ, ब्राह्मण-मराठा, ब्राह्मण-प्रभू आदि वाद फोफावले. कर्मकांड हिंदूंच्या हाडीमाशी खिळलेले. ते अधिकच माजले. याचा पुसटसाही उल्लेख कादंबरीत येत नाही (शोध, पृ. १०८). उलट राक्षसभुवनावर राघोबाचा हत्ती निजामाच्या अरबांनी वेढला असता मल्हारराव होळकर माधवरावांना 'सुंठीवाचून खोकला गेला' असा सल्ला देतात, तो रणजित देसायांनी मल्हाररावांच्या तोंडी, 'बाळा, मागे फीर. आज आपल्याला जय नाही,' हे वाक्य घालून (त्यातही 'मागं' नाही शुद्ध 'मागे') मल्हाररावांची 'बाजू' सांभाळली आहे (स्वामी, पृ. १३८). सारांश 'स्वामी' पेशवाईत घडत नाही. ती शनिवारवाडा, रणांगण आणि थेऊर येथेच घडते. अवघ्या कादंबरीत माधवराव एकदाच पुण्याच्या रस्त्यात दिसतात. म्हणूनच 'स्वामी' हे माधवरावांचे चरित्रलेखनही नव्हे तर ते केवळ व्यक्तिरेखन (Portrait) आहे आणि व्यक्तिरेखनचित्रे केवळ दिवाणखान्यातच लावतात.

त्यामुळेच समीक्षकांना गंगोबा तात्यांना कडक शासन का होते आणि ते सखारामबापूंना का होत नाही (शोध, पृ. १२९) असे प्रश्न पडतात. पुण्याचा देशस्थ ब्राह्मण वर्ग दुखावू नये म्हणून, की बापूंनाही बुद्धिबळाच्या पटावर काही महत्त्व आहे म्हणून, हे प्रश्न अनुत्तरित राहतात. राघोबांचा कायमचा बंदोबस्त करणे माधवरावांना शक्य नव्हते काय? इंग्रजांनी वाजिद अली, दुसरा बाजीराव, त्र्यंबकजी डेंगळे, थिबा राजा, बहादूरशहा जफर यांचा असा बंदोबस्त केला नाही काय? स्वतः माधवरावांनी गंगोबाला बेड्या ठोकल्याच की नाही? मग चुलत्याविषयी इतका हळुवारपणा का? आणि मग कर्तव्यकठोरतेचा एवढा डांगोरा का? पुढे याच राघोबाने अवघी मराठी दौलत खिळखिळी करून टाकली, त्याचे पाप कुणाच्या माथी? पण माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाने भारलेल्या रणजित देसायांना हे प्रश्न पडत नाहीत.

---

राज्याच्या शत्रूशी-निजामाशी-हातमिळवणी करणाऱ्या राघोवांना धारेवर धरणारे माधवराव त्याच राघोबाला निष्प्रभ करण्यासाठी त्याच निजामाशी तह करतात. राघोबाने म्हटल्याबरोबर तत्क्षणी हैदरवरची मोहीम आटोपती घेतात, याचा काही उलगडा न केल्यास माधवरावांच्या चरित्रचित्रणात काही न्यून येईल असे रणजित देसायांना वाटत नाही. आणि सामान्य वाचकाला तर सोडाच पण मान्यवर समीक्षकांनाही प्रश्न पडत नाही.

असाच प्रकार माधवरावांच्या राष्ट्रीय बाण्याविषयी आहे. इंग्रज वकील मॉस्टीनशी बोलताना माधवराव त्याला खडसावतात, 'साहेब! आमचे शत्रू कोण? निजाम? उत्तरेचा बादशहा? दक्षिणेतला हैदर? साहेव! यापैकी कुणीही विजयी झाले तरी ते आमचेच आहेत. भारतीय आहेत. त्यांचा पराभव करण्यासाठी तुमच्यासारख्या परकीयांची मदत कशी घेणार?' येथे भारतीय हा शब्द माधवरावांच्या मुखी घातला आहे. तसेच इंग्रज ताजवा फेकून तलवार घेतात, याची जाण माधवरावांना आहे असे दाखविले आहे. हे सर्व माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाचे उन्नयन करण्याचे कृत्रिम प्रयत्न वाटतात.

याविषयीचे म. वा. धोंड यांचे विवेचन (शोध, पृ. ८०-८१) मूळातूनच वाचावे असे आहे. आपल्या नायकाच्या तोंडून राष्ट्र, देश, भारतीयत्व अशा संकल्पना वदवणारे आमचे 'ऐतिहासिक' कादंबरीकार मराठे उत्तर भारत, माळवा, छत्तीसगढ भागात 'गनीम' लुटारू का ठरले? कर्नाटकातील मुद्दाचारी मराठ्यांच्या विरोधात का लिहितो? लेडी सरकार सर जदुनाथ सरकारांना सोडून गो. स. सरदेसायांच्या कामशेत येथील वंगल्यात रहायला का भितात? अवघा भारत व्यापूनही मराठे शेवटपर्यंत मोगल बादशहाचे 'फिदवी' (विश्वासू) का राहिले? मुतालिकच का राहिले? त्यांचे स्वतंत्र सार्वभौम राज्य (श्रीशिवछत्रपतींप्रमाणे) न होता दौलतच का राहिली? या प्रश्नांनी रणजित देसाई आणि वाचकही व्यथित होत नाही. सगळं कसं माधवरावांभोवती फिरत असतं. 'मधुराधिपतेरखिलं-मधुरं' प्रमाणे. मधून मधून राघोवा, बापू, भोसले, आजार अशा प्रसंगाची तिखट चटणी असते. तेव्हा स्वामी नामक हा 'प्रकार' 'लोक' प्रिय ठरावा यात नवल ते काय? या लोकप्रियतेच्या दबावाखालीच परीक्षणे लिहिली गेलीत की काय अशीही रास्त शंका येते.

संपूर्ण कादंबरीत उत्तर भारताच्या राजकारणाचा कुठेही उल्लेख नाही. माधवराव थेऊरास आजारी असता उत्तरेतील विजयाची वार्ता येते. पण हा विजय नेमका कोणता हे मात्र शेवटपर्यंत कळत नाही. तो बहुधा पत्थरगड (वजीवाबाद)-घोसगढची लढाई असावी (४ मार्च १७७२). यामागे एक कारण संभवते. उत्तरेतील राजकारणे कादंबरीत येत नाहीत. कारण चरित्रनायक माधवरावच उत्तर भारतात गेले नाहीत. राक्षसभुवन, आलेगाव, कर्नाटक (निसटते उल्लेख), शनिवारवाडा, थेऊर या बांधबंदिस्तीतील कादंवरी मग पसरट झाली असती. तिचे टोकदारपण हरवले असते, हे तर खरेच; पण समग्र

भारतावर मराठेशाहीचा काय आणि कसा प्रभाव होता, याचा कादंबरीरूप आलेख मांडायचा आवाका मराठी कादंबरीकारात नाही. रणजित देसाई हे तर खांडेकरी परंपरेतले. नूतन राज्य संपादून अभिषिक्त सार्वभौम सम्राट व्हावे, हा शिवछत्रपतींचा मार्ग. हे राज्य कल्याणकारी राज्य असावे हा त्यांचा ध्यास. पण हा मार्ग पुढे सुटला. शाहू दक्षिणेत आला तोच मुळी खुलदावाद येथील औरंगजेबाच्या कबरीचे दर्शन घेऊन. नंतर शाहू आणि ताराबाई यांच्यात गृहयुद्ध पेटले आणि पुढे छत्रपति म्हणून कुणाला मान्यता द्यायची - सातारा गादीला की कोल्हापूर गादीला? याच्या उचापती निजाम करू लागला. पेशवे धन्यापेक्षा प्रबळ झाले. साताऱ्याहून पेशवाईची वस्त्रे येणे एवढाच स्वामी-सेवकभाव ठरला. शिवछत्रपतींचा मार्ग सोडल्याबद्दल शेजवलकर मराठ्यांवर-पेशवाईवर मोठ्या आवेशाने तुटून पडले आहेत. बाळाजी विश्वनाथाने स्वराज्याची सनद आणून, मोगलांचे संरक्षकपद स्वीकारून स्वराज्याची भाड खाल्ली इथपर्यंत ही जहरी टीका पोचली आहे. मराठ्यांनी मोगल बादशहाने दिलेली चौथ आणि सरदेशमुखी वसूल करताना 'लुटारू' ही पदवी संपादन केली. त्यांच्यापासून संरक्षण व्हावे म्हणून बुंदेलखंडात, उत्तर भारतात गावोगाव गढ्या बांधल्या गेल्या. मराठे गनीम ठरले. उपरे ठरले.

राजकारणाचा हा प्रवाह बदलणे माधवरावाला - दीर्घ आयुष्य प्राप्त झाले असते, तरी शक्य नव्हते. हैदर-निजामावर स्वाऱ्या, खंडण्या, तह, थोडीफार करडी शिस्त, चौकस राजकारण हे माधवरावांचं मर्यादित कर्तृत्व आहे. याच चौकटीत राहून ते जोखावे लागते. म्हणूनच एकीकडे दादाना निजामाशी हातमिळवणी केल्याविषयी दोष देणारे माधवराव टोक्याचा श्रीभंग करणाऱ्या त्याच निजामाशी कुरुमखेडला तह करतात. पुण्याच्या देवस्थानाची विटंबना करणाऱ्या निजामाला 'भारतीय' म्हणतात.

अखिल भारतीय राजकारणाचा आवाका सोडाच; पण माधवरावांचे जे सरदारमंडळ आहे, तेही माधवरावाच्या व्यक्तिचित्राला चौकट देणारेच आहे. यांची फक्त नावे 'स्वामी'त येतात. त्यांचे स्वभाव, कारस्थान, हेवेदावे, रुसवेफुगवे येतच नाहीत. माधवरावांना 'आज्ञेप्रमाणे येऊन वऱ्हाडचे पुरते पारिपत्य करतो' असे आश्वासन देणारे महादजी शिंदे कुठे भेटत नाहीत. भेटतात ते माधवरावांच्या तोंडच्या उत्तरेतील विजयाच्या कौतुकात (स्वामी, पृ. ३६५) असा हा सगळा एकसुरी (Monotonous) मामला आहे. उलट शिवछत्रपतींचा मार्ग आणि पेशवाईतील मार्ग यांच्यात झालेली फारकत 'स्वामी'मध्ये माधवरावांच्या मुखी शिवरायांविषयी, त्यांच्या लालमहालाविषयी गौरवोद्‌गार घालून भरून काढण्याचा प्रयत्न रणजित देसायांनी केला आहे, असे साधार वाटते. शेवटी हाती राहते ते इतकेच की 'स्वामी' भारताची, पेशवाईची कादंबरी न राहता माधवरावांची कादंबरी होते. ती सामान्य वाचकाच्या आवाक्यात राहते. प्रसंगामधून प्रसंग येत राहतात. एक सलग (थोडे कृत्रिम, पण) आदर्श चरित्र अगदी आधुनिक नागरी मराठी भाषेतून,

पेशवाईच्या एकदोन वैभवशाली वर्णनांसह समोर येते. अर्थात ते सामान्य वाचकाला भावते.

## ५. 'स्वामी'ची भाषा

'स्वामी' च्या भाषेविषयी म. वा. धोंड यांचा लेख गाजला आहे. वादविषयही झाला आहे. म. वा. धोंडांच्या मते माधवराव इंग्रजी अमदानीनंतरची आधुनिक अशी नागर भाषा बोलतात (शोध, पृ. ८१-८९). त्यावर रणजित देसाई असा मुद्दा मांडतात की 'मला माझी कादंबरी जनसामान्यांपर्यंत पोचायला हवी होती' (शोध, पृ. १८८). त्यांना बखरीची भाषा दप्तरी आणि कृत्रिम वाटते. 'शिवाजीच्या समकालीन तुकाराम आठवावा' असेही ते म्हणतात. डॉ. मीरा धांडगेही याच मताचे समर्थन करतात (शोध, पृ. ५-७). पण धोंडांचा मूळ मुद्दा कुणी फारसा समजून घेतलेला दिसत नाही. अगद थेट बखरीचीच भाषा वापरावी असा धोंडांचा आग्रह नाही. तत्कालीन भाषा थोडी ग्राम्य, क्वचित् शिवराळ असे; पण म्हणी, वाक्प्रचार, थेट ग्रामीण शब्दांचा डौल यांनी अलंकृत असे. गालिबने पर्शियन शब्दांचा वापर करून लिहिलेल्या गजला बोजिल, अप्रिय आणि उपहासाला पात्र ठरल्या. पण त्याच्या रेख़्ता (रिख़्ता, दिल्लीतील जनसामान्यांची मुहावरेदार भाषा) स्वीकारताच तो लोकप्रिय झाला. स्वतः रणजित देसायांनी तत्कालीन पत्रे आणि बखरीतून शब्दांची आणि वाक्यांची उचल केलीच आहे. माधवरावांनी लिहिलेल्या पत्रात 'गंगेने नबाबाची मोठी कुमक केली' असे वाक्य आले आहे. गोदावरीस जनलोक गंगा म्हणतात. रणजित देसायांनी हे वाक्य 'काका, गोदावरीने आज निजामाची मोठी कुमक केली' असे वापरून 'गंगा' हरवून टाकली आहे. माधवरावांनी गोपिकाबाईंना लिहिलेल्या पत्रातील 'प्रस्तुत दादासाहेब व आम्ही एक झालो हीच गोष्ट एका करोडीची झाली' याही वाक्याचा डौल बिघडवून ते माधवराव-दादा संवादात 'आमच्या घरचे वैर मिटले, याचे मोल आम्ही फार समजतो' असे फिरवून त्यातला अवघा डौल हरवून टाकला आहे (शोध, पृ. ८२).

रणजित देसाई यांचे समर्थन विभा शहा (शोध, पृ. १६१) आणि डॉ. मीरा घांडगे (शोध, पृ. ६-७) यांनी केले आहे. पण ते लंगडे आहे. मीरा घांडगे यांनी उद्धृत केलेले परिच्छेद रामजी खिदमतगार आणि जिऊबाई निंबाळकर यांच्या मुखीचे आहेत. त्यातच जिऊबाईची भाषा थोडी कोल्हापुरी धाटणीची (रणजित देसायांच्या प्रदेशातील) वाटते. त्यातही जिऊबाई 'आनि' न म्हणता 'आणि' असा शुद्ध नागर उच्चार करतात. यामुळे धोंडांचा मुद्दा तसाच राहतो. पेशवाईतील सोडा, अगदी गेल्या पिढीत चांगल्या घरच्या स्त्रियाही, 'बाई! सैंपाक व्हायचाय! आता येतील पोरं दीन गाजवीत' असं सुंदर बोलून जायच्या. महासाधू तुकाराम महाराजांच्या भाषेचा डौल काय सांगायला हवा? त्यांचे 'भले तरी देऊ ...... लंगोटी' हे शब्द बदलून लिहावे लागतात. आचार्य अत्र्यांनाही ते बदलावे

लागले. तेव्हा रणजित देसायांच्या तुकाराम महाराजांचा मुद्दा पोचट ठरतो.

शिवाय तत्कालीन भाषेत अनेक उर्दू पर्शियन शव्द रुळले होते. माधवराव 'खामोष' म्हणून जरव देतात. जामा, निमा, तमामी, जिलेवीचे हत्ती, शुत्तरस्वार, सांडणीस्वार (हे दोघे वेगळे कसे?), हत्तीचा किलावा, खवासखाना, बकावत, सलूख असे कितीतरी शव्द रणजित देसाई वापरतात. यांनी रसहानी कशी होत नाही? पण मग माधवरावांच्या तोंडी मात्र पुणेरी नागर सदाशिवपेठी सरळसोट भाषा का? तिचे समर्थन कशासाठी? माधवराव स्वतःला पेशवाई डौल घालून 'आम्ही' म्हणतात. त्याच प्रसंगात 'मी, मला' ही उपयोजितात (स्वामी, पृ. २७८). मल्हाररावांशी वोलताना त्यांना एकदा 'आपण', एकदा 'तुम्ही' असा गोंधळ घालतात (स्वामी, पृ. ११७-११८, शोध पृ. ८४). ते इतरांच्या 'मताशी सहमत' होतात (स्वामी, पृ. २७१). 'आज्ञापत्रके' काढतात, कनिंग हॅमला शुद्ध 'डॉक्टर' म्हणतात (स्वामी, पृ. ३०३). आणि 'डाक्तर'ही म्हणतात (स्वामी पृ. ३५५). रमावाईही अगदी 'कनिंग हॅम काका' म्हणतात. मराठे एलफिन्स्टनचं अळुपिष्टन, कर्कपॅट्रिकचं किडका पादरी, मॅलेटचे मिलीट, क्लोजचे कलोष, कॅप्टन स्टीवर्टचे इस्टुर फाकडा करीत तसे करीत नाहीत.

राघोबादादाचा मुलगा भास्कर अपघाती मरण पावतो. त्यावर माधवराव 'आज तुमचा भास्कर गेला नाही, माधव गेला असं समजा. तुमचा भास्कर तुमच्यासमोर उभा आहे' असं म्हणतात (स्वामी, पृ. १२६). हे वाक्य वाजी भिवराव रेठरेकर हा वीर व्रसई-तारापूरच्या मोहिमेत खर्ची पडल्यानंतर त्याच्या मातुश्रींना नानासाहेब पेशव्यांनी लिहिलेल्या पत्रातील 'सारांश मीच तुमचा वाजीराव असा विवेक करून धीर धरावा.' (राजवाडे खंड २, लेखांक १६०) यांचे अनुकरण आहे. तसेच माधवरावांच्या शेवटच्या आजारातील दौलतीसाठी चार वर्षे मागणे, उपभोगासाठी नको असे मागणे (स्वामी, पृ. ३३१) यावर राम गणेश गडकऱ्यांच्या 'राजा हा संपत्तीचा उपभोगशून्य स्वामी' याची दाट छाया सहज जाणवते. एकवीस आवृत्त्या निघूनही कादंबरीचे नीट परिष्करण झालेले नाही, असेच म्हणावे लागते. त्यात पुन्हा मुद्राराक्षसांच्या लीला वेगळ्याच.

## ६. नायक आणि न-नायक

माधवराव हे ऐतिहासिक व्यक्तिमत्त्व. त्यांना नायक कल्पूनच 'स्वामी' लिहिली गेली. पण हा चरितनायक सामान्य माणसाच्या पातळीवर आणण्याचा एक आगळा प्रयोग 'स्वामी' ने सुरू केला. मग इतर चरितनायकही तसेच बेतले गेले. म्हणूनच प्र. ना. परांजपे 'श्रीमान योगी' मधील महाराज फार वेळा अश्रू ढाळतात यावर नेमके बोट ठेवतात. (शोध, पृ. १८८). पण इतिहासनायक इतके हळवे नसतात. प्लेगमध्ये आपला मुलगा गेल्याची तार आल्यावर 'सार्वजनिक होळीत आमच्याही घरची गवरी गेली' असे धीरोदात्त

उद्‌गार लोकमान्य टिळकांनी काढल्याची आख्यायिका आहे. ते असो. पण अतिशय हळूवार कविप्रकृतीचा, पंचाहत्तरी पार केलेला बहादूरशहा जफरही आपल्या मुलांची रक्तरंजित मस्तके हडसनने तबकात घालून पुढे आणल्यावर धीरोदात्तपणे म्हणाला, 'मुगलिया सल्तनत की औलाद बुजुर्गो के सामने ऐसीही सूर्खरूह होकर आती है' (सूर्ख रूह = लाल तोंड, यशस्वी). 'ऐ मेरे वतन के लोगों' ऐकून स्वर्गीय पंडित नेहरूजी रडले ते देशासाठी. स्वतःच्या कुटुंबातील घरगुती कलहांनी खचून जाऊन नव्हे.

विभा शहा यांनी नायकाला सामान्य माणसाच्या पातळीवर आणून ठेवण्याच्या या लकबीवर प्रख्यात समीक्षक रा. ग. जाधव यांचे भाष्य उद्‌धृत केले आहे, ते असे -

'नायकाच्या शोधात असलेली मनोवृत्ती इतिहासाकडे वळताना निर्नायकी वर्तमानकाळाच्या प्रेरणा विसरू शकत नाही आणि म्हणूनच इतिहासातील थोरांचे सामान्यपण तिच्या नकळत ती मांडू पहाते. म्हणजे नायकांच्या शोधासाठी निघायचे आणि ते सापडल्यावर त्यांच्यातील न-नायकी सामान्यपण चित्रित करायचे, हा एक अर्थपूर्ण विरोधाभास (Paradox) असून गेल्या दशकातील ऐतिहासिक साहित्यामध्ये तो सतत प्रगट झाला आहे (शोध, पृ. १५७). हे सर्व भाष्य मुळातूनच वाचावे असे आहे. या ऐतिहासिक व्यक्तींची सुखदुःखे अगदी चाळकरी चाकरमान्यांच्या सुखदुःखांच्या पातळीवर आणून ठेवणे कितपत कलात्मक ठरते? त्यावरचे विभा शहा यांचे भाष्य कितीही मोहक असले तरी असली सुखदुःखे मांडण्यासाठी ऐतिहासिक कर्तृत्ववान वीर पुरुष निवडणे, त्यांच्या राजकारणाचा आणि पराक्रमांचा भाग पार्श्वभूमी (Backdrop) म्हणून वापरत, त्यांना सामान्य माणसाच्या पातळीवर आणणे हे लोकप्रिय होईल, रसिकप्रियही होईल; पण हे महापुरुष महान यत्नाने जे 'कालचक्रही फिरवितात' ते त्यांच्या इतिहासावर नाममुद्रा उमटवण्याच्या अचाट उद्योगाचे शिवधनुष्य पेलू शकत नाहीत हे मात्र जाणवत राहते. जे सामर्थ्य War and Peace च्या विशाल कालपटात आहे, मानस का हंस, परती परिकथा, गणदेवता, शांतला, आशापूर्णादेवीच्या सुवर्णलता आदि तीन कादंबऱ्या, साहब, बीबी और गुलाम सारख्या अन्यभाषीय कादंबऱ्यांत आहे तो अवाकाच इथे कुणाला जाणवलेला दिसत नाही. आणि म्हणूनच माधवराव (खरे तर 'पेशवाईतील' माधवराव) हा रणजित देसाईंच्या चिंतनाचा विषय झालेला नाही, असे विभा शहा म्हणतात.

पेशवाईत अनेक दोष होते. लोकहितवादी, नानासाहेब चापेकर, शेजवलकर, राजवाडे (ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकरांवरचा लेख), आदींनी ते दाखविले आहेत. अनेक कु-रूढी, कर्मकांड, होमहवन, अभिचार-जादूटोणे, बहुपत्नीत्व, अंगवस्त्रे, नाटकशाळा, लाचखोरी, जातीयवाद, क्षुद्र मत्सर, हेवेदावे आदि. शेजवलकर पेशव्यांनी शिवछत्रपतींचा मार्ग सोडला म्हणून जहरी टीका करीत. पेशवाईला भटकुलबादशाही म्हणत. निजाम पूर्णपणे नष्ट न करता पेशवे उत्तर भारत बडवीत बसले म्हणून कर्कश चिरकत. एकमेकांना

सोबती म्हणणाऱ्या शिंदे-होळकरांच्या तर लढायाच झाल्या (लाखेरीची लढाई). पण इतके सगळे असूनही पेशव्यांनी जवळजवळ सगळा भारत मुस्लिम वर्चस्वापासून मुक्त केला हे सत्य शिल्लक राहतेच. ते शेजवलकरांनाही जाणवले आहे (पानिपत, १७६१ पृ. २६०). नरहर कुरुंदकरांनीही शेजवलकरांवरील मृत्युलेखात ते नोंदविले आहे (मागोवा पृ. १७९). पेशव्यांच्या घोड्यांनी जेवढा भारत तुडवला तेवढाच आज स्वराज्यात आहे असे कुरुंदकर मार्मिकपणे म्हणतात.

पण मराठ्यांच्या या अखंड, अफाट, अविश्रांत आणि अभिमानास्पद उद्योगावर विशाल कादंबरीपट विणावा असा आवाका असणारा कादंबरीकार निर्माण होईल तो मराठेशाहीचा सुदिन. शिवछत्रपतींचा जीवनपट असाच प्रचंड आणि अनेकरंगी आहे. त्यावर कादंबरी बेतणाऱ्या रणजित देसाईंना 'नापासातील पहिल्या क्रमांकाचे' असा जो 'घरचा' आहेर कुरुंदकरांनी दिला त्याचे मर्म हेच आहे (श्रीमान योगी, प्रथम भाग पृ. २९). असा सर्वत्र रखरखाट असताना, आहेत तशा विदुराच्या कण्या 'स्वामी' रूपाने वाचकांनी गोड मानून घेतल्या, समीक्षकांनी वाखाणल्या यात त्यांचे काय बरे चुकले? नाही तरी हरि नारायण आपटे, नाथमाधव, वि. वा. हडप यांच्यानंतर ऐतिहासिक कादंबरीची निर्मिती नव्हतीच. वाचक उपाशी होताच. त्याने 'स्वामी' आनंदाने स्वीकारली. मस्तकी धरली. त्यांचे एक असो, पण समीक्षकांनाही पेशवाईच्या इतिहासाचा हा विशालपट जाणवला नाही, हे मात्र खटकते.

## ७. स्वामी आणि रणजित देसाई

कुठलीही कलाकृती घडत असताना कलाकाराचे व्यक्तिमत्त्व त्या कलाकृतीतून उमटतेच ('आहे पक्षीच दुसरा त्या गाण्यात'), तसेच रणजित देसाईही 'स्वामी' मध्ये भेटतातच. रणजित देसाई गानलुब्ध होते हे आम्ही अनुभवले आहे. मग 'स्वामी'त मोरेश्वर भट येणे अपरिहार्य ठरते. मग तो सूर्योदयापूर्वी शुद्धकल्याण हा सायंकाळचा राग का गाईना! पेशवे निजामाशी तह करतात आणि त्यांना वेरूळचे शिल्प वाचवायची विनंती करतात (स्वामी, पृ. २४८). १७६६ त वावरणारा पेशवा वेरूळकडे तीर्थक्षेत्र म्हणून पाहील की शिल्प म्हणून पाहील हा प्रश्नच आहे. त्यातही वेरूळ होळकरांच्या ताब्यात होते. ते यात्रेकरूंकडून कर घेत असत. होळकर-पवारांच्या काळातील चित्रेही वेरूळच्या 'कैलासा'त आहेत, ते वेगळेच.

रणजित देसाई संस्थांनी वातावरणात वावरलेले. राघोबादादांकडे सोवळ्याचे पाणी भरणारा शागीर्द विष्णू 'सोवळेकरी' बुंदीच्या लाडवांचे ताट 'बैठकीवर' आणून ठेवतो आणि मग राघोबांचे 'सोवळ्याचे' पाणी आणायला जातो (स्वामी, पृ. १९६). यात बैठक 'खरकटी' होईल हे सोवळेओवळे पाळणारे राघोबा कसे विसरतात?



अनुक्रमणिका

रमाबाईंच्या कुंकवाचे डाग माधवरावांच्या अंगरख्यावर पडणे ठीक, पण तो डाग रमाबाई काकुळती येऊन पुसायचे सांगत असतांनाही (स्वामी पृ. २५७). ते श्रृंगारचिन्ह मिरवीत सदरेवर जाणे पेशवाईत तर सोडाच, पण गेल्या पिढीत तरी शक्य होते काय?

इंग्रजांचा भारतातील राजकारणाच्या आखाड्यात अगदी प्रथम प्रवेश झाला तो प्लासीच्या लढाईने (इ. स. १७५७). माधवराव आणि मॉस्टिन यांची भेट इ. स. १७६७ ची. या वेळी सखाराम बापूंसारख्या जाणत्या मुत्सद्यांच्या तोंडी 'जगावर राज्य करणारी ही माणसं' असे उद्‌गार येणे अंमळ चमत्कारिकच वाटते. तत्कालीन समाजाविषयी अज्ञान, कालविपर्यय (anachronism), आधुनिक संकल्पनांचा गतकाळावर आरोप हे ऐतिहासिक कादंबरीला हमखास होणारे अपघात असतात. पण त्यांची संख्या 'स्वामी'त फार नाही ही समाधानाची बाब आहे.

## ८. 'स्वामी'चे परीक्षणलेखक

'स्वामी' वर आलेल्या एकूण २१ लेखांचे संकलन करून मीरा धांडगे यांनी मोठीच कामगिरी पार पाडली आहे. यात काही परीक्षणे अगदीच भारावून जाऊन केलेली स्तुती आहे. आचार्य अत्रे यांचे परीक्षण असे आहे. मनापासून आणि भरघोस कौतुक करणे हा आचार्य अत्रे यांचा स्वभावच होता. अरविंद याळगी यांची तीन परीक्षणेही याच अंगाने जातात. पण इतर लेखकही 'स्वामीं'चे अपूर्व यश, नाट्यमय प्रसंगांची गुंफण, माधवरावांचा त्याग, देशप्रेम, शिस्त, पराक्रम, न्यायनिष्ठुरता, दुःख सोसण्याचे सामर्थ्य, दक्ष आणि साक्षेपी नजर आदी गुणांनी विनटलेलं रूपदर्शन यांनी अगदी भारावून गेले आहेत. सर्वांनी घेरलेला चिंकारा आणि नारायणरावांनी आणलेली दोन हरिणशावके यांच्या प्रतीकांनी साक्षेपी समीक्षकही भारावून गेले आहेत (शोध, पृ. ९९, प्रा. डॉ. पंडित आवळीकर). काहींना माधवरावांच्या पुण्यातील विजयी मिरवणुकीची, हरिहरेश्वरची वा थेऊरची निसर्गवर्णने आवडली आहेत. काहींना संवाद आणि वजनदार वाक्ये आवडली आहेत. काहींना इतिहासातला माधवराव मोठा वाटतो, काहींना 'स्वामी'तला.

पण सर्वचजण भारावून गेले आहेत ते रमाबाईंच्या सहगमनाच्या प्रसंगाने. चितेतून उडताना दिसणारा जरीचा पदर अनेक समीक्षकांचे डोळे पाणावून गेला आहे आणि त्यात नवल वाटण्याचे काही कारणही नाही. मराठा इतिहासात सती फारच थोड्या झाल्या. शिवछत्रपतींच्या पुतळाबाई, बळवंतराव मेहेंदळे यांची पत्नी आणि रमाबाई पेशवीण. जिजाबाईसाहेब, महासाध्वी अहिल्याबाई या सती जाता जाता राहिल्या. महाराष्ट्रात सतीशिळाही फारशा आढळत नाहीत. म्हणूनच रमाबाई 'पाषाणहिय्या करून धर्मशिळेवर उभ्या ठाकल्या' हा पोवाड्याचा विषय झाला. 'स्वामी'च्या यशात रमाबाईंच्या सहगमनाचा फार मोठा वाटा आहे.

'स्वामी'वर परीक्षणे लिहिणारे बहुसंख्य प्राध्यापकच आहेत; पण म्हणतात ना, प्रत्येक गार्डाची शिटी वेगळी. म. वा. धोंड यांनी 'स्वामी'च्या इंग्रजी वळणाच्या भाषेवर शरसंधान केले, तर शं. गो. राजवाडे यांनी आपल्या लेखात पार्टी, प्यून, ओॲसिस, Your services are no more required असा शेरा माधवराव मारीत नाहीत, इत्यादी इंग्रजी शब्दांनी जणू धोंडांचे गांडीव तोडून टाकले आहे (शोध, पृ. १२६). श्रीपती आणि मैना यांचा प्रेमविवाह होणे त्यांना जरा अवघड वाटते; तर विष्णुभटाचे प्रकरण त्यांना अप्रस्तुत वाटते. पेशवे स्वतःला राज्याचे स्वामी म्हणवितात (स्वामी, पृ. ३५०). याविषयी राजवाडे यांचा आक्षेप आहे. पण राज्य सातारच्या छत्रपतींचे असले तरी खरे राज्य पेशव्यांचेच होते. त्यामुळेच माधवरावांच्या अंतर्मनातून असा उद्‌गार निघाला असावा. मात्र कुणीही समीक्षालेखक मूळ साधनांचा अभ्यास करण्याच्या भानगडीत पडलेला दिसत नाही एवढे खरे. माधवरावांचा मृत्यू राजयक्ष्मा होऊन झाला. ते अकालीच वारले. मराठेशाहीवर हा फार मोठा आघात झाला. ग्रँट डफने त्याविषयी मोठे मार्मिक वाक्य लिहिले आहे. हा करुण अंत श्री. मा. कुलकर्णी यांना माधवरावांचा मृत्यू हा एका तपात राज्याची घडी बसवणाऱ्या कर्तृत्ववान पुरुषाचा धीरोदात्त मृत्यू वाटतो (शोध, पृ. ६०). तर 'स्वामी'तला हा प्रसंग यशवंत पाठक यांना बटबटीत वाटतो (शोध, पृ. १४६). रघुनाथराव हा या कादंबरीतला खलपुरुष. माधवरावावर मारेकरी घालण्याइतका अधःपतित. त्याच्यावर सर्वच समीक्षकांनी राग काढला आहे. पंडित आवळीकरांना मात्र तो 'कसाही असला तरी कोणीही प्रेम करावे असा खास आहे' (शोध, पृ. ९६) असे वाटते. मग भलेही तो तीनधारी लिंबू भारून माधवरावांच्या नाशाचा प्रयत्न का करीना?

## ९. काही प्रश्न

'स्वामी' ही इतिहासाशी कमालीचे, पराकोटीचे इमान राखून लिहिलेली कादंबरी आहे, असा स्वतः रणजित देसायांचा आणि सर्वच समीक्षकांचा दावा आहे. पण काही प्रश्न शिल्लक उरतातच. भाऊसाहेब पेशव्यांच्या तोतयाची चौकशी कशी झाली? मल्हारराव होळकराने हजीर मजालस भरवून, हरि दामोदर नेवाळकर (झाशीच्या राणीचा पूर्वज), भाऊसाहेबांची बहीण अनुताई घोरपडे यांच्या घरी पंधरा दिवस ठेवून, जनकोजी शिंद्यांचा तोतया रुबरू करून चौकशी झाली. त्याला बुधवाराच्या हौदाजवळ दिवसभर उभा करून लोकांना पाहू दिला. पर्वतीवर रामशास्त्री आणि इतर शास्त्र्यांनी त्याची चौकशी केली. यात माधवरावांचे कुठेही नाव येत नाही. रणजित देसाई हा प्रसंग मात्र अक्षरशः गुंडाळतात.

असाच आणखी एक प्रश्न गोपिकाबाईंविषयी आहे. ती शनिवारवाडा सोडून का गेली? केवळ तिच्या भावाला-मल्हारराव रास्ते यांना शासन झाल्यामुळेच (स्वामी, पृ. १७१-१७३) की तत्कालीन देशस्थ-कोकणस्थ वादाला त्या खतपाणी घालत होत्या, हेही

एक कारण आहे? माधवराव आजारी असता गोपिकाबाई पुण्यात येऊन त्यांना भेटून काही दिवस राहून गेल्या होत्या. सन १७७१ च्या चैत्रात त्या पुण्यात होत्या असे गो. स. सरदेसाई नोंदवितात (निग्राहक माधवराव, पृ. २४१). मात्र 'जुन्या पिढीची करारी माणसे प्रतिज्ञेसाठी ज्या कठोरपणाने स्वतःला वागवतात त्यातलाच तो भाग असावा असे मला वाटते.' (स्वामी, तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना) असे म्हणतात. मग इतिहासाशी इमान कुठे उरले. जी बाई प्रतिज्ञा मोडून पुण्यात येते, ती मुलाच्या निधनप्रसंगी हजर नसेल? ती जर एवढी करारी (सामान्य कर्तृत्वाची असूनही), तर शिवाजी, नेहरू का रडतात? माधवराव का हळवे होतात?

मीर मुसा आणि शेरजंग हे शिया पंथाचे होते. निजाम मात्र सुन्नी पंथाचा होता. याचा फायदा घेऊन माधवरावाने त्यांना निजामापासून फोडले असे यशवंत पाठक नोंदवितात (शोध. पृ. १३७). यासाठी त्यांनी काय आधार घेतला आहे तो कळत नाही. शेरजंग हा निजामअलीकडे वसुलीच्या कामावर होता. निजाम अलीने सलाबतजंग यावर अत्याचार चालविले तेव्हा त्याने सलाबतजंगाचा पक्ष घेतला व निजाम अलीशी पटेनासे झाल्यावर तो पेशव्यांच्या आश्रयाला आला. उलट राक्षसभुवनानंतर तो परत निजामाकडे गेला. याचे मूळ नाव हैदर यारखान. शेरजंग ही पदवी.

असाच प्रकार रमाबाईंच्या सती जाण्याविषयीचा आहे. मूळ कागदपत्रात सतीच्या शेजारी तिला चितेत ढकलण्याठी टोकदार हिरवे वासे घेतलेले लोक वा तिच्या किंकाळ्या ऐकू जाऊ नयेत म्हणून ढोल वाजवणारे ढोलकरही नव्हते, असा स्पष्ट उल्लेख असता रणजित देसायांनी त्यांचा का उल्लेख केला आहे, कुणास ठाऊक?

माधवराव तत्कालीन प्रथेप्रमाणे श्रद्धाळू होते. मुरलीधर ज्योतिषराव नामक त्याचा ज्योतिषी असे. तो मुहूर्त काढून देई. सन १७७० त स्वारीस निघावे तो 'चतुर्थ दिवसाचा गुंता पडला. सबब राहिले.' असा उल्लेख आहे. त्यांच्याविषयीच्या

वृष्टिंविना पंकमहो विचित्रं
स्थलद्वये तिष्टति सार्वकालं ।
दानांवुभिर्माधवरायमंदिरे
विप्रस्य बाष्पैः खलु रामशास्त्रिणाम्॥

या श्लोकावरून ते दानधर्मही विपुल करीत असावेत असे दिसते.

### १०. शोध

'स्वामी' प्रथम प्रकाशित झाली ती १९६२ च्या ऑगस्टात. या कादंबरीवरील डिसेंबर १९६२ ते १९९८ पर्यंत आलेल्या परीक्षण लेखांपैकी २१ परीक्षण लेखांचा हा संग्रह मीरा

घांडगे यांनी अतिशय कष्टाने सिद्ध केला आहे. त्याला विवेचक प्रस्तावनाही जोडली आहे. त्यांचा हा व्याप, आटोप आणि साक्षेप अतिशय मोलाचा आहे.

'सोळाव्या वर्षी स्वराज्याचा मांड मांडणारे शिवछत्रपती आणि वयाच्या सोळाव्या वर्षी पेशवाईची वस्त्रे धारण करणारे माधवराव पेशवे ही ऐतिहासिक व्यक्तिचित्रे आजच्या काळातही कुणालाही मोह पाडू शकणारी आहेत' या एका वाक्यातच 'स्वामी'च्या यशाचे रहस्य त्या सांगून जातात. स्वामी ऐतिहासिक कादंबरी असली तरी त्यातून 'रोमँटिक' रणजित देसाई डोकावतातच, हा द. ता. भोसले यांचा शेरा त्यांनी अचूक टिपला आहे. रणजित देसाईंच्या या वृत्तीमुळेच त्यांची पात्रे शाश्वत जीवनमूल्यांचा अभ्यास घेताना दिसतात. हरिहरेश्वरचं निसर्गसौंदर्य, मोरेश्वराचं गायन हे प्रसंग याच दृष्टीने पहावेत हे त्यांचे निरीक्षण यथायोग्य आहे.

पण 'स्वामी' ही इतिहासाशी इमान राखणारी कादंबरी आहे काय? रणजित देसाईंनी इतिहासाचा सखोल अभ्यास खरोखरच केला आहे काय? याची चिकित्सा घांडगे करीत नाहीत. ही कादंबरी इतिहासापासून वेगळी भावकादंबरी कशी, याचेही तपशीलवार विवेचन येत नाही. 'स्वामी'च्या भाषेविषयी त्या देसाईंचा पक्ष उचलून धरतात; पण त्याविषयीचे विवेचन आधी येऊनच गेले आहे. रमावाईंच्या सहगमनाच्या प्रसंगाने त्याही भारावून गेल्या आहेत. 'स्वामी' मधील भावोत्कट प्रसंगांची मालिका, नाट्य, वजनदार संवाद यावर त्यांनी नेमके बोट ठेवले आहे.

'स्वामी'वर परीक्षणलेखकांनी काही आक्षेप घेतले आहेत. त्यांची यादी मीरा घांडगे देतात; पण त्यांचे खंडन मात्र फारसे प्रभावी वाटत नाही. उलट "अशा साहित्यकृतीचे श्रेष्ठत्व शोधता शोधता तिच्यातील दोष शोधण्याची 'छिद्रान्वेषी' प्रवृत्ती समीक्षकांमध्ये असतेच" असेही त्या फटकारतात. रमा, माधव आणि त्यांनी जिवंत केलेली इतर पात्रे याविषयीचे त्यांचे विवेचन मर्मग्राही आहे.

पण त्यांनी अतिशय मार्मिकपणे टिपली आहे, ती 'स्वामीं'ची ग्रीक शोकात्मिकेच्या (tragedy) अंगाने जाणारी शोकात्मिका. त्यांच्या मते ही कादंबरी मुळातच शोकात्म (tragic) आहे. कादंबरीचा शेवट या शोकात्मतेचा सर्वोच्च बिंदू आहे. तिचा शेवट शोकान्त आहे. अस्वस्थ आणि अंतर्मुख करणारा आहे. ग्रीक शोकात्मिका नाट्यरूप आहेत. 'स्वामी' गद्य कादंबरी असून तिच्यात विलक्षण नाट्यमयता आली आहे, 'स्वामी' मधील शोकात्मभाव व रचनेतील नाट्यमयता ग्रीक ट्रॅजिडीच्या जवळ जाते व स्वामी शोकात्मिकाच ठरते. माधवरावाचे एकूण जीवनच शोकात्म आहे. ही व्यक्तिरेखा एखाद्या वीरकाव्याला शोभेल अशी तेजस्वी लखलखीत व अखेर मृत्यूमुळे जीवनाप्रमाणेच दैवावरही मात करणारी अशी जाणवते. माधवरावांचे मानवी जीवन व नियती यांचा कादंबरीत

सुरुवातीपासून शेवटपर्यंत अटळ संघर्ष दिसतो. शोकात्म परिस्थिती, शोकात्म संघर्ष व शोकात्म जीवनप्रवास यांच्या एकरूपतेतून अतिशय उत्कट दुःखाची अभिव्यक्ती झालेली दिसते. मीरा घांडगे यांचे हे विवेचन अभिनव आणि इतर सर्व समीक्षकांच्या विवेचनांपेक्षा वेगळे आणि अधिक मर्मग्राही आहे.

## ११. स्वामींचा प्रभाव

'स्वामी'ने मराठी ऐतिहासिक कादंबरीला नवीन वळण दिले असे बहुसंख्य समीक्षक म्हणतात; पण 'स्वामी'नंतर आलेल्या कादंबऱ्या इतिहासातील छोट्या-मोठ्या व्यक्तींची वकिली करण्यासाठी लिहिल्या गेल्या असे द. ता. भोसले नोंदवतात (शोध, पृ. १५२). असे का व्हावे? कारण 'स्वामी'ची व्यक्तिप्रधानता. चरित्रात्मक भावकहाणीचे रम्य स्वरूप. 'स्वामी' रमा-माधवाची कहाणी आहे; पेशवाईची नाही. मराठी साम्राज्याची नाही. शनिवारवाड्याची-थेऊरची आहे. महाराष्ट्राची वा भारताची नाही. तिचा ते आवाकाच नाही. म्हणून व्यक्तिप्रधान कादंबऱ्यांचे आडमाप पीक आले. अवघा भारत मुस्लीम मगरमिठीतून सोडविण्याचा मराठ्यांचा अपरंपार, जगद्व्याल उद्योग पेलण्याचं सामर्थ्य तिच्या ठायी नाही. 'स्वामी' लोकप्रिय आहे. सुंदर आहे. पण ती अतिशय देखण्या (पण भग्न हातांच्या) वीनसच्या पुतळ्यासारखी आहे. तिला आवळीकर हस्तप्राप्यस्तबकनमिती-बालमंदारवृक्षः' म्हणतातच. फुलांनी लदबदलेला आणि सहज हाताला येणारा.

ती श्रवणबेळगोळच्या भव्य, विशाल आणि तरीही भुवनमोहन गोमतेशाची उंची कशी गाठणार? मराठी ऐतिहासिक कादंबरी गोमतेश्वर घडवणाऱ्या अरिष्ठनेमि शिल्पीच्या प्रतीक्षेत आहे!

- महामहोपाध्याय डॉ. ब्रह्मानंद देशपांडे
'ऐतिहासिक', १४, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद - ४३१००५

❑ ❑

संदर्भ -

१. स्वामी रणजित देसाई, आवृत्ती १० वी - अजब पुस्तकालय-जानेवारी १९८१
२. 'शोध' - स्वामी - एक शोध, संपादक मीरा घांडगे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, जाने. २००१
३. निग्राहक माधवराव, गो. स. सरदेसाई, के. भि. ढवळे, मुंबई - १९५४
४. श्रीमान योगी, रणजित देसाई, देशमुख आणि कंपनी, १९६८
५. पानिपत - १७६१, त्र्यं. शं. शेजवलकर, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, १९६१
६. मागोवा, नरहर कुरुंदकर. देशमुख आणि कंपनी, - १९६७










○

## म. सा. प. कार्यकारी मंडळ सदस्य

(एप्रिल २००१ ते मार्च २००६)

○

श्री. राजेंद्र बनहट्टी : अध्यक्ष
डॉ. आनंद यादव : उपाध्यक्ष
डॉ. नागनाथ कोत्तापल्ले : उपाध्यक्ष
श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक : उपाध्यक्ष
डॉ. गं. ना. जोगळेकर : कार्याध्यक्ष
श्री. ह. ल. निपुणगे : प्रमुख कार्यवाह
श्री. रत्नाकर कुलकर्णी : कोषाध्यक्ष
श्री. दीपक करंदीकर : कार्यवाह - स्मृति-दिन, व्याख्याने
श्रीमती नंदा सुर्वे : कार्यवाह - पारितोषिके - विशेष कार्यक्रम
डॉ. कल्याणी दिवेकर : कार्यवाह - ग्रंथ निवड - पारितोषिके
डॉ. कल्याण इनामदार : कार्यवाह - परीक्षा विभाग
श्री. रंगा मराठे : कार्यवाह - ग्रंथालय
श्री. प्रमोद आडकर - कार्यवाह - अतिथी निवास
डॉ. अरविंद वामन कुळकर्णी : म.सा.पत्रिका संपादक
डॉ. शंतनु चिंधडे - प्रतिनिधी, पुणे मनपा
डॉ. अरविंद संगमनेरकर - प्रतिनिधी, पुणे मनपा
डॉ. अरविंद लेले - प्रतिनिधी, पुणे मनपा
श्री. अरविंद भुजबळ - प्रतिनिधी, पुणे जिल्हा (पुण्याबाहेरील कार्यवाह)
डॉ. भगवान ठाकूर - प्रतिनिधी, धुळे जिल्हा (पुण्याबाहेरील कार्यवाह)
डॉ. दीपा वि. देशपांडे : इस्लामपूर - प्रतिनिधी, कोल्हापूर जिल्हा
सौ. वैशाली ना. नायकवडे : इचलकरंजी - प्रतिनिधी - कोल्हापूर जिल्हा
श्री. नारायण शिरसाळे : जळगाव - प्रतिनिधी - जळगांव जिल्हा
श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली : सोलापूर - प्रतिनिधी - सोलापूर जिल्हा
श्री. प्रकाश होळकर : लासलगाव - प्रतिनिधी - नाशिक जिल्हा
श्री. सुरेश देशपांडे : डोंबिवली - प्रतिनिधी - ठाणे जिल्हा
श्री. प्र. अ. संत : कल्याण - प्रतिनिधी - ठाणे जिल्हा
श्री. विजय द. नगरकर : श्रीरामपूर - प्रतिनिधी - अहमदनगर जिल्हा
श्री. मधुसूदन दि. नेने : वाई - प्रतिनिधी - सातारा जिल्हा
श्रीमती लिमये प्रतिमा : रत्नागिरी - प्रतिनिधी - रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड जिल्हा



अनुक्रमणिका

## स्वागत

१. डॉ. आंबेडकर यांची घटना समितीतील भाषणे - भाग १ ला : डॉ. बी. आर. जोशी व प्रा. सौ. भाग्यरेखा जोशी, श्री विद्याप्रकाशन, पुणे. पृष्ठे १०७

२. संयुक्त आघाडीतून स्थिर सरकारकडे : वा. दा. रानडे, श्री विद्या प्रकाशन, पुणे पृष्ठे ११६

३. मी कृष्णा : नारायण कृष्णाजी कांबळे, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७६

४. सकाळ वृत्तपत्र व वृत्तपत्र समूह : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, पृष्ठे १३८

५. अन्वयार्थ : विजया राजाध्यक्ष, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २४४

६. झेनगार्डन : मिलिंद बोकील, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २३२

७. श्यामिनी : तारा वनारसे, मौज प्रकाशन मुंबई, पृष्ठे १७२

८. सोव्हीएत साम्राज्याचा उदय आणि अस्त : गोविंद तळवलकर, पृष्ठे ३५६

९. कॅन्सर : माझा सांगाती : डॉ. अरविंद नावडेकर, मौज प्रकाशन, मुंबई

१०. रस्ते मनातील : डॉ. पी. जी. कुलकर्णी, गौरव प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे १०६

११. हैद्राबादचा स्वातंत्र्य संग्राम आणि मराठवाडा : अनंतराव भालेराव, मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठे ५७४

१२. अफाटराव : मंगेश पाडगांवकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठे ३२

१३. पाखरू निळं निळं : मंगेश पाडगांवकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठे ३२

१४. वाढदिवसाची भेट : मंगेश पाडगांवकर मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठे ३२

१५. आढव डोह : व्यंकटेश वळसंगकर, मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा, पृष्ठे ५७

१६. घोड्या पुढे गीता : विश्वनाथ खैरनार, संमत प्रकाशन, औंध, पृष्ठे १८

१७. साहित्य मिथ्य माहिक : विश्वनाथ खैरनार, संमत प्रकाशन, औंध, पृष्ठे ६८

१८. हारास : किशोर सानप, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९६

१९. एड्सला जाणून घ्या : राजीव उन्हाळे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ८८

२०. निवडक अभंग : संपा. पाटंगणकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १०८

२१. हिंडपी : रा. ना. रणसिंग, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३२

२२. कल्पवृक्षाचे छायेत : अरविंद सुर्वे, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८०

२३. विस्तवाचे वास्तव : सुमती कोडवत्तूनवार, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७६

२४. युरोप सहलीचा सोवती : कल्याण गाडगीळ, वा. बा. कर्वे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे २२२.

२५. कसा निवडाल कॉम्प्युटर : रवींद्र देसाई, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८२
२६. चोळी बांगडी : पी. के. जाधव, समर्थ साई वितरण, पुणे, पृष्ठे १३२
२७. प्रभातचा उदयास्त : माधव शेवाळे, मंजुळ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६
२८. वेधडक : मुरलीधर बागुल, श्रीसमर्थ साई वितरण, पुणे, पृष्ठे ११६
२९. आम्रपालवी : फुला नागुल, श्रीसमर्थ साई वितरण, पुणे, पृष्ठे ७०
३०. आत्मगुंजन : राजेंद्र भागवतकर, एस्. जी. कोळेकर, एन्टरप्राईज, पुणे, पृष्ठे ६८
३१. अनादी अनंत : चंद्रकुमार नलगे, सुरेश एजन्सी, पुणे, पृष्ठे १९६
३२. डॉ. ग. वा. तगारे गौरव ग्रंथ : संपा. डॉ. वि. भा. इनामदार, वा. वा. गोगटे सांगवी, पृष्ठे २७८
३३. मुग्धा : सौ. सी. व. केतकर, शलाका मुद्रणालय, कल्याण, पृष्ठे १८

खालील पुस्तकांचे प्रकाशक मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई.

३४. ओश्तोरीज : अनंत सामंत, पृष्ठे १६८
३५. छंदाविषयी : अनिल अवचट, पृष्ठे १४८
३६. संसार गाथा : शोभा बोंद्रे, पृष्ठे २८८
३७. हिलाल : राजन ख़ान, पृष्ठे २२४
३८. मी आणि माझा देव : वि. शं. चौघुले, पृष्ठे २०४
३९. हसरे विज्ञान : सुबोध जावडेकर, पृष्ठे १४२
४०. अजबनगरी : अविनाश कोलारकर, पृष्ठे ४८
४१. रात्र क्षितिजावरची : भारत सासणे, पृष्ठे १९०
४२. साकी : बार ॲण्ड रेस्टारंट : पंकज कुरूलकर, पृष्ठे १८०
४३. क्षितिजे अपार : हुसेन दलवाई, पृष्ठे १४२
४४. व्यवस्थापन घरीदारी : सुहास भास्कर जोशी, पृष्ठे १९८
४५. पर्लवक : आशा कर्दळे, पृष्ठे १३६
४६. आमच्या लहानपणी : सौ. मोहिनी निमकर, पृष्ठे १७८
४७. समांतर : विजया राजाध्यक्ष, पृष्ठे १७६
४८. चार दिवस प्रेमाचे : रत्नाकर मतकरी, पृष्ठे ७६
४९. जायंट व्हील : निरंजन उजगरे, पृष्ठे १२०
५०. क्षितीजे अपार : हुसेन दलवाई, पृष्ठे १४२

५१. दूर तेथे दूत तेव्हा - सर्प : भारत सासणे, पृष्ठे २३०

५२. आयुष्याची छोटी गोष्ट : भारत सासणे, पृष्ठे १९४

५३. गोतावळा : शिरीष कणेकर, पृष्ठे १४८

५४. स्वभाव-विभाग : डॉ. आनंद नाडकर्णी, पृष्ठे १८२

५५. युद्धमीमांसा : दि. वि. गोखले, पृष्ठे ५२०

५६. जय बाबा फेलूनाथ : मूळ लेखक सत्यजित राय, अनुवाद नीलिमा भावे, पृष्ठे ११२

५७. हिरोशिमाच्या कविता : अनु. निरंजन उजगरे, पृष्ठे ७६

५८. काजळत्या दिशा : सुभाष भेण्डे, पृष्ठे १९४

५९. मराठी नाटक सृष्टी आणि दृष्टी : मधु जामकर, गोदावरी प्रकाशन औरंगाबाद, पृष्ठे १०६

६०. मराठी कविताध्यासन अभ्यास : मधु जामकर, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद.

६१. उमाजी राजे : शंकर नऱ्हे, कॉन्टिनेटल प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३६८

६२. शैलसंवाद : प्रा. शैलेश त्रिभुवन, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०४

६३. हटप्रदीपिका वृत्ती (भोजात्मक) संपा. म. ल. घरोर, पृष्ठे ५८

६४. उत्क्रांत लेणी : विनोद बुरबुरे, प्रबोधन प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ६०

६५. लाटू शेट वाटुळा : श्रीनिवास शिंदगी, रमानारायण प्रकाशन, सांगली, पृष्ठे ४६

६६. एक मुंगी नेसली लुंगी : श्रीनिवास शिंदगी, रमानारायण प्रकाशन, सांगली, पृष्ठे ५०

६७. पुंगीवाला : श्रीनिवास शिंदगी, रमानारायण प्रकाशन, सांगली, पृष्ठे ३६

६८. वरेच काही उगवून आलेला : द. भा. धामणकर, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८६

६९. पंखा : प्रकाश नारायण संत, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ११२

## नवे आजीव सभासद

सिंगम सत्यनारायण व्यंकटनरसु, सोलापूर

माणेकर व्यंकटेश नागप्पा, सोलापूर

कोठाडिया सरिता नलिन, सोलापूर

आवटे प्रदीपकुमार श्रीधर, सोलापूर

घिवारे सूर्यकांत व्यंकप्पा, सोलापूर

भोसले राजेंद्र बलभीम, सोलापूर

रघोजी संध्या विजय, सोलापूर

अंधळगांवकर हरिभाऊ रंगनाथ, सोलापूर

वैद्य श्रीनिवास माधवराव, सोलापूर

बडवे प्रशांत सदाशिव, सोलापूर

दाते अनंत धुंडिराज, सोलापूर

रघोजी नंदकुमार श्रीनिवास, सोलापूर

गुजोटीकर अनिल कमलाकर, सोलापूर
फुंडीपल्ले बंडाप्पा बाबुराव, सोलापूर
राऊत नारायण रामचंद्र, सोलापूर
राऊत प्रमिला नारायण, सोलापूर
कुलकर्णी जगदीशचंद्र कृष्ण, सोलापूर
संगमवार नारायण भूमय्या, सोलापूर
काळे मंदार मधुकर, सोलापूर
लांडगे संजय संभाजी, सोलापूर
दानवाडे बापूसाहेब तातोबा, सोलापूर
काळे गोविंद जातोबा, सोलापूर
औटी देवेंद्र गणपतराव, सोलापूर
पटवर्धन शशिकांत गणेश, पुणे
पेठकर मोहिनी प्रकाश, नासिक
जराड ज्ञानेश्वर विनायक, फलटण
शेंडगे विजय सुखदेव, पुणे
शहा स्वाती अशोक, पुणे
खोलगडे रवींद्र मधुकर, पुणे
गोडबोले मंगला श्रीनिवास, पुणे
धायगुडे भूपेंद्र यशवंत, पुणे
पवार कमल श्रावण, मालेगाव कॅम्प
गांधी नीलिमा सुनील, पुणे
कार्यवाह,
सार्वजनिक वाचनालय, नासिक (सलग्नसंस्था)
रहाळकर श्रेयसी भरद्वाज, नासिक
रहाळकर भरद्वाज पुरुषोत्तम, नासिक
झेंडे मधुकर यादव, नासिक
शेलार ज्ञानेश्वर किसनराव, नासिक
कदम रमेश नामदेवराव, नासिक
आफळे सुभाष गोविंद, नासिक
दायमा सरोज रमेश, नासिक
निचळ गिरीश गणपत, नासिक
कुलकर्णी हेमंत दत्तात्रय, नासिक
बागुल राजेंद्र हरिभाऊ, नासिक
छाजेड जयप्रकाश जितमल, नासिक
गोसावी अशोक रामगीर, नासिक
जातेगांवकर जयप्रकाश रामकिसन, नासिक
भातंवेकर जयंत भास्कर, नासिक
बागड दीपक रामचंद्र, नासिक
मुंगी माधवी मधुकर, नासिक
महाजन नरेश शंकर, नासिक
कांबळे नागेश भीमराव, नासिक
भांडारे रेखा वसंत, नासिक
पुरंदरे मंगेश मनोहर, नासिक
औरंगाबादकर मुरलीधर शंकर, नासिक
पिंपळे गिरीश प्रभाकर, नासिक
उत्पात शशिकला मधुकर, पंढरपूर
नलावडे प्रताप प्रभाकर, पंढरपूर
आराध्ये कुसुम रामचंद्र, पंढरपूर
नातू हरि गंगाधर, पंढरपूर
देशमुख गोपाळराव मारुती, पंढरपूर
कवीश्वर दिनार दत्तात्रय, ठाणे
उटगी विश्वास रामचंद्र, ठाणे
देशपांडे चारुशीला मुकुंद, पुणे
मोरे पुष्पा सुधाकर, इचलकरंजी
तारळेकर शशिकांत दगडुशेठ, इचलकरंजी
राठी राजेंद्र लक्ष्मीनारायण, इचलकरंजी
जाधव सुनील लहु, इचलकरंजी
बोरगांवकर अशोक मुरलीधर, इचलकरंजी

गोवंडे समीर अशोक, इचलकरंजी
डुवाळ साहेबराव जिजाबा, बोरगांव
कोकाटे आर. बी., सांगली
रोटे मनीषा चंद्रकांत, इस्लामपूर
कुलकर्णी सुधाकर केशव, इस्लामपूर
नानल अंजली प्रकाश, सोलापूर
शिंदे सुशीलकुमार संभाजीराव, सोलापूर
काडादी धर्मराज अण्णाराज, सोलापूर
काळे आरती प्रसाद, सोलापूर
म्हमाणे अवधूत भीमराव, सोलापूर
ऋचा संजय, सोलापूर
मेगाजी नरसिंग मांधवराव, सोलापूर
रायते वासुदेव श्रीनिवास, सोलापूर
रायते माधवी वासुदेव, सोलापूर
निशानदार विजय दत्तात्रय, सोलापूर
निशानदार नीलिमा विजय, सोलापूर
वच्चुवार दिलीप श्रीधर, सोलापूर
कुमठेकर शिरीष नीळकंठ, सोलापूर
क्षत्रिय ज्योती श्रीराम, सोलापूर
वाघमोडे गंगाधर बाबूराव, सोलापूर
अध्यापक लता वसंतराव, सोलापूर.
रिसवुड श्रीधर हेमंत, सोलापूर
घळसासी विवेक कृष्णाजी, सोलापूर
दोशी विद्याधर केशरचंद, सोलापूर
माने धनंजय एकनाथ, सोलापूर
वळसंगकर अशोक विष्णुपंत, सोलापूर
शिवदे सदाशिव सखाराम, पुणे
कुळकर्णी रवींद्र कृष्णनाथ, सोलापूर
पाटील मंगेश नवलसिंग, सोलापूर
सांगळे मुरलीधर भगवान, धुळे
येवले सचिन भिका, धुळे
भगरे सुभाष आत्माराम, धुळे
शिंदे वर्षा नीळकंठ, धुळे
बरीदे मुकुंद व्ही., धुळे
बरीदे आरती मुकुंदराव, धुळे
पवार हिरामण डी., धुळे
साठे योगिनी श्रीकृष्ण, पुणे
साठे श्रीकृष्ण तथा राजसभाऊ साठे, पुणे
शहा शर्मिला प्रणयकुमार, इचलकरंजी
आपटे सीमंतिनी आप्पाजी, पुणे
ओक श्रीकांत वासुदेव, पुणे
पेंडसे-नाईक वसुंधरा सुधीर, मुंबई
कुलकर्णी दिलीप दत्तात्रय, पुणे
गोखले प्रतिभा सुरेश, पुणे
कुलकर्णी उपेंद्र दामोदर, पुणे
कुलकर्णी श्रीकांत नारायण, पुणे
ठकार संजीव सुरेंद्र, पुणे
जाखडे भारती अरुण, पुणे
फडके अरुण गोपाळ, ठाणे
काजरेकर अर्पणा, ठाणे
जोशी अनिरुद्ध चिंतामणी, ठाणे
सहस्रबुद्धे वसुधा वसंत, ठाणे
वैद्य जयंत अनंत, ठाणे
सुखटणकर शुभांगी अच्युत, ठाणे
वैद्य नीलिमा प्रभाकर, ठाणे
घाटे स्नेहल नंदकिशोर, ठाणे
लोहकरे योगेशचंद्र दत्तोबा, ठाणे
भिडे स्वप्ना चैतन्य, ठाणे

आगाशे विनिता वासुदेव, ठाणे
देशपांडे सुरेश दत्तात्रय, ठाणे
करमरकर नारायण दत्तात्रय, ठाणे
परांजपे सुनील विनायक, ठाणे
नातू अश्विनी सचिन, ठाणे
जोशी प्रफुल्ल सदाशिव, ठाणे
मोडक मिलिंद सुधाकर, ठाणे
घाणेकर जया चं., ठाणे
रेगे प्रभाकर वामन, ठाणे
रेगे प्रमोदिनी प्रभाकर, ठाणे
रेगे मकरंद प्रभाकर, ठाणे
रेगे स्वाती मकरंद, ठाणे
लिखार रमेश माधवराव, ठाणे
जोग संजय सुधीर, ठाणे
देशमुख संजय वसंत, ठाणे
बोराडे पांडुरंग गणपत, ठाणे
काणे दीपेश यशवंत, ठाणे
कुलकर्णी स्वाती देवीदास, ठाणे
अकोले राजेंद्र मुरलीधर, ठाणे
नित्सुरे माधुरी विनायक, ठाणे
नित्सुरे सीमा श्रीहरी, ठाणे
नित्सुरे प्रमोद मधुसूदन, ठाणे
नित्त्सुरे चिंतामणी वासुदेव, ठाणे
साने गजानन यशवंत, ठाणे
सहस्रबुद्धे मधुसूदन भास्कर, ठाणे
थत्ते सतीश यशवंत, ठाणे
दांडेकर सुरेश गणेश, ठाणे
भावे विकास मधुसूदन, ठाणे
वल्लाळ कुमुदिनी नरेंद्र, ठाणे
पवार मोरेश्वर, ठाणे
भालेकर विजय नामदेव, ठाणे
पाटील सुरेखा रमेश, ठाणे
पवार प्रभाकर मोतीराम, ठाणे
कोरगांवकर विनायक नीळकंठ, ठाणे
पवार केशव गोपाळ, ठाणे
पवार गजानन गोपाळ, ठाणे
पाटील सुधीर काशिनाथ, ठाणे
पाटील राकेश दशरथ, ठाणे
पाटील दशरथ काशिनाथ, ठाणे
देवसंडीकर विजय हनुमंत, ठाणे
नित्सुरे मृणाल प्रभाकर, ठाणे
केळकर मुकुंद गणेश, ठाणे
आंबर्डेकर रवींद्र श्रीराम, ठाणे
बापट भाग्यश्री अशोक, ठाणे
प्रसादे अरुण एकनाथ, ठाणे
नातू मेधा मुकुंद, ठाणे
पाटील राजेश, ठाणे
चांदगुडे जालिंदर जयसिंग, पुणे
फाळके युवराज शंकर, पुणे
सोनावणी विनोद देवीदास, पुणे
दिवेकर अनंत दामोदर, संगमनेर
चांदवणकर रमेश शांताराम, पुणे
संभूस प्रमोद नानासाहेव, पुणे
पंडित श्रीनिवास प्रभाकर, पुणे
माळी चिंतामणी रंगनाथ, श्रीरामपूर
दिवे अशोकराव श्रीमंत, टिळकनगर
निकम पोपटराव सखाराम, टिळकनगर
आगाशे मनीषा माधव, श्रीरामपूर

जाधव रागेश्री दिलीप, श्रीरामपूर
नगरकर विभावरी दत्तात्रय, श्रीरामपूर
कोयटे सुधीर दादाप्पा, कोपरगाव
चुग ओमप्रकाश पहुमलख, श्रीरामपूर
बनकर अशोक निवृत्ती, श्रीरामपूर
अपशंकर सुजाता विलास, श्रीरामपूर
गिरमे मिलिंद प्रभाकर, श्रीरामपूर
अग्रवाल अशोक बावूराव, श्रीरामपूर
देशपांडे सरिता अजित, श्रीरामपूर
देशपांडे अजित वाळकृष्ण, श्रीरामपूर
कांबळे भिका सखाराम, श्रीरामपूर
पंडित हर्षदा सुनील, श्रीरामपूर
आगाशे माधुरी संजीव, श्रीरामपूर
शिरसाठ दिलीप भाऊसाहेब, श्रीरामपूर
शिरसाठ सविता दिलीप, श्रीरामपूर
मालपाठक सुजाता सुरेश, श्रीरामपूर
खंडागळे भास्कर भगवंतराव, श्रीरामपूर
सौदागर वाबासाहेव भानुदास, श्रीरामपूर
गवले ज्ञानेश्वर विठ्ठलराव, बेलापूर॥बु॥
जोशी(कडेकर) शशिकांत चंद्रचूड, बेलापूर॥बु॥
कासारपाटील सुरेखा बाळासाहेब, श्रीरामपूर
मुंदडा पुष्पा सोमनाथ, श्रीरामपूर
पाटणी मनोज हुकुमचंद, श्रीरामपूर
देशपांडे सुनंदा गंगानाथ, श्रीरामपूर
तार्के मितेश केशवराव, श्रीरामपूर
मराठे अपर्णा अरुण, कोपरगांव
कुंदे ललिता भास्करराव, श्रीरामपूर
क्षीरसागर सुनीता विजय, कोपरगांव
भवर केशवराव छगनराव, कोपरगांव
डागा सुधीर श्रीराम, कोपरगांव
जवाद श्रद्धा गोविंद, कोपरगांव
आहेरराव सुधीर बाबुराव, कोपरगांव
देशपांडे अनघा प्रमोद, श्रीरामपूर
खटोड चित्रा बाळासाहेब, श्रीरामपूर
देशपांडे विलास विष्णू, श्रीरामपूर
ठक्कर सुषमा यतिन, श्रीरामपूर
ओझा शरद रमेश, श्रीरामपूर
गोराणे काशिनाथ पुंजाजी, श्रीरामपूर
वरखेडकर प्रसन्ना चंद्रकांत, अशोकनगर
घोरपडे दत्तात्रय विठ्ठल, श्रीरामपूर
थिटे अलका चंद्रकांत, श्रीरामपूर
थिटे चंद्रकांत संदीपन, श्रीरामपूर
पंतवैद्य उषा नारायण, श्रीरामपूर
आढाव मंगलताई रामदास, श्रीरामपूर
राजे डॉ. सौ. माधवी, श्रीरामपूर
कदम सुधीर(आप्पासाहेब) नामदेव, श्रीरामपूर
गिरमे सौ. साधना, श्रीरामपूर
बढे सौ. भाग्यश्री, श्रीरामपूर
कार्यवाह-मराठी वाङ्मय परिषद बडोदे(संलग्न)

**शहापूर शाखेचे नवे सभासद**

अवसडे रमेश भास्कर
ओक माधव मोरेश्वर
आठवले गोपाळ सदाशिव
काकडे भानुदास रंगनाथ
काबाडी सोमनाथ द्वारकानाथ
कुंटे किशोर वसंत
गांधी राजेंद्र कांतिलाल

गांधी वसंत पोपटलाल
गांधी नरेंद्र वसंत
गुजरे सुभाष चिंतामण
गुजराथी सतीश क़ाशिनाथ
गोरे शुभांगी रामचंद्र
गोडबोले राजेंद्र विष्णू
घोडके कुमुदिनी दिनकर
जागरे पांडुरंग दुदाजी
जोशी सुधाकर बाळकृष्ण
जोशी श्रीकांत पुरुषोत्तम
झंवर अरुण भगवानदास
दातार आशा अरविंद
देशमुख कुंडलिक चंद्रकांत
देशमुख जयवंत पांडुरंग
देशमुख रमाकांत नारायणराव
देशपांडे सूर्यकांत पांडुरंगराव
देशमुख प्रसन्न अनंत
देशपांडे कुमुदिनी विनायक
देसाई मुकुंद वसंत
धर्मे भगवान दत्तात्रय
नवले गंगाधर भिमाजी
नवथरे महेंद्र वसनजी
निकार्ते सुधीर हरिभाऊ
पंडित गंगाधर परशुराम
फलटणकर लीलादेवी मधुकर
बढे लता यशवंत
बोरसे विजय देवीदास
भांगरथ प्रकाश पांडुरंग
महाजन विजय वसंत
मस्तुद संदीपन जनार्दन
माळी प्रकाश बाबूराव
श्रीमाली संजय प्रभाकर
वंजाराजी मोहन टिलाराम
वाघचोरे बालचंद्र निवृत्ती
वानखेडे विद्या शरद
वेर्खेडे भालचंद्र मुकुंद
सूर्यराव आत्माराम तुकाराम
शहा वीरेंद्र भिकुभाई
शेणॉय विश्वनाथ आप्पा
क्षीरसागर कीर्ती किरण

**विक्रमगड जि. ठाणे, आदिवासी विभाग शाखेचे नवे सभासद**

आळशी घन:श्याम लक्ष्मण
टिळक गीतांजली गजानन
लटके संदीप जी.
मनोरे अरुण ना.
पै सतीश मुकुंदराव
भोरकर अनिरुद्ध ज्योतिप्रकाश
पाटील विनायक रामचंद्र
भानुशाली मनोज विठ्ठल
आळशी स्वप्नील शांताराम
बांगर पुरुषोत्तम बळवंत
आळशी संजय शांताराम
सावंत प्रकाश एकनाथ
जेठे दिगंबर पुरुषोत्तम
भानुशाली दीपक रत्नसेन
सांबर भूपेंद्र आवाजी

पाटील मुकेश विठ्ठल
कोरे विजय आत्माराम
पाटील सुनील विठ्ठल
औसरकर विजय शंकरराव
थाळेकर उर्मिला लहु
आळशी सागर विजय
बरसकर विलास मधुसूदन
राजे अनंत नामदेव
प्रजापती रमेश छबिनाथ
पाटील विजय चिंतामणी
आळशी संचित रसिक
जगे सुचिता रूपेश
तामोरे नितीन हरिश्चंद्र
भानुशाली मिलिंद ईश्वर
आळशी रवींद्र वासुदेव
पाटील सुधाकर विठ्ठल
वाडेकर पुरुषोत्तम मार्तंड
धनगर दशरथ भिका
भानुशाली भूषण ईश्वर
पाटील नितीन विजय
आळशी प्रज्योती प्रदीप
भानुशाली योगेश चंद्रकांत
चांडोळे रघुवीर दामोदर
जैन ललित फौजमलजी
आळशी महेश वसंत
निंबाळकर विजय जयराम
पाटील संदीप बाळकृष्ण
पाटील कविता वसंत
पाटील प्रभाकर रघुनाथ
वाघचौरे वसंत यशवंत
पाटील सदाशिव शंकर
औसरकर प्रीतम कांतिलाल
रोडगे परेश शरद
पाटील राजेंद्र तुळशीराम
भानुशाली प्रकाश भास्कर

❑ ❑

म. सा. परिषदेचा ९५ वा वर्धापन दिन दि. २६ आणि २७ मे २००१ रोजी पुणे मुक्कामी संपन्न झाला. त्या संबंधीचे विशेष वृत्त आणि श्रीपाद जोशी या सत्कारमूर्तीचे मनोगत पुढील अंकात देण्यात येईल.



अनुक्रमणिका

○

# कार्यवृत्त

## १ जानेवारी २००१ ते ३१ मार्च २००१

○

**दि. ११ जानेवारी २००१**

कै. वि. स. खांडेकर यांच्या जन्म दिनानिमित्त डॉ. अविनाश आवलगावकर यांचे 'खांडेकरांची कविता' या विषयावर भाषण.

**दि. १८ जानेवारी २००१**

कै. वि. द. घाटे स्मृतिदिनानिमित्त डॉ. अरविंद लेले यांच्या अध्यक्षतेखाली कविसम्मेलन आयोजित करण्यात आले. सूत्र-संचालन कवी अरविंद भुजवळ यांनी केले. यामध्ये सुहास घुमरे, उद्धव कानडे सुलभा कामत, शीला निपुणगे आदि कवि- कवयित्री यांनी भाग घेतला.

**दि. २६ फेब्रुवारी २००१**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत विनोदी लेखनासाठी दिले जाणारे कै. चिं. वि. जोशी पारितोषिक 'बाई माणसाची अब्रू' या श्री. भा. महाबळ यांच्या पुस्तकास सौ. मंगला गोडबोले यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षकांतर्फे डॉ. द. दि. पुंडे यांचे भाषण झाले. परीक्षक म्हणून डॉ. द. दि. पुंडे आणि डॉ. अ. वा. कुळकर्णी यांनी काम केले होते.

**दि. २७ फेब्रुवारी २००१**

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कवी कुसुमाग्रज पुरस्कार कवी उत्तम कोळगावकर यांच्या 'तळपाणी' या कविता संग्रहास प्रा. रा. ग. जाधव यांच्या शुभहस्ते देण्यात आले. परीक्षकांतर्फे डॉ. शंतनु चिंधडे यांचे भाषण झाले. परीक्षक म्हणून डॉ. शंतनू चिंधडे आणि प्रा. सुजाता शेणई यांनी काम केले होते.

**२९ जानेवारी २००१**

दिवाळी अंक पारितोषिक वितरणाचा विशेष कार्यक्रम श्री. चंद्रकांत शेवाळे, संपादक 'ग्रहांकित' यांच्या हस्ते झाला. 'सुगंध' या दिवाळी अंकाला अ. स. गोखले स्मृत्यर्थ रत्नाकर पारितोषिक, 'ऋतुरंग' या दिवाळी अंकाला, विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक, 'दीपावली' या दिवाळी अंकाला का.र. मित्र पारितोषिक, साप्ताहिक सकाळ ला शं. वा. किर्लोस्कर स्मृति-पारितोषिक देण्यात आले. उत्कृष्ट कथेचे कै. दि.अ. सोनटक्के पारितोषिक 'अंत्ययात्रा' या माधुरी शानभाग यांच्या कथेला, ललित लेखाचे अनंत काणेकर पारितोषिक 'साहित्यातील सदाहरित बाग' या श्री. दीपक घारे यांच्या लेखाला देण्यात आले.

**५ फेब्रुवारी २००१**

सुप्रसिद्ध नाटककार कै. वसंत कानेटकर यांना म.सा.प. चे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली समर्पण सभा झाली. श्री. अरुण कानेटकर, सौ. जयश्री वैद्य, श्री. चित्तरंजन कोल्हटकर,



अनुक्रमणिका

श्री. श्याम कोपर्डेकर यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली.

**७ मार्च २००१**

कै. प्रा. श्री. ना. बनहट्टी जन्मशताब्दी स्मृति-व्याख्यानः 'श्री. ना. बनहट्टी व्यक्ती वाङ्मय आणि कार्य' या विषयावर डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे व्याख्यान झाले.

**९ मार्च २००१**

महाराष्ट्र कवी यशवंत काव्य पारितोषिक वितरण श्री. गंगाधर महाम्बरे यांच्या हस्ते झाले. डॉ. सुहासिनी इर्लेकर यांच्या 'छांदस' या काव्यसंग्रहाला हे पारितोषिक देण्यात आले. परीक्षक म्हणून डॉ. शंतनू चिंधडे आणि प्रा. सुजाता शेणई यांनी काम केले होते.

**२० मार्च २००१**

कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या स्मृति-दिनानिमित्त 'मर्ढेकर काव्यदर्शन' हा कार्यक्रम श्रीमती मधुवंती सप्रे, भारती देशमुख आणि अंजली कुलकर्णी यांनी सादर केला.

**२९ मार्च २००१**

श्रेष्ठ इतिहास संशोधक कै. शं. ना. जोशी पुरस्कार डॉ. अ. रा. कुलकर्णी यांना त्यांच्या 'कंपनी सरकार' या ग्रंथासाठी श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते देण्यात आला. परीक्षकांच्या वतीने डॉ. म. वि. गोखले यांचे भाषण झाले. सहपरीक्षक स.मा.गर्गे होते.

**३० मार्च २००१**

श्रीमती ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत, शरच्चंद्र चट्टोपाध्याय पुरस्कार श्रीमती शिरीष पै यांना अ. भा. सा. महामंडळाच्या अध्यक्षा श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते देण्यात आला.

❑ ❑

## ○ आभार ○

१) श्रीमती मालती गाडगीळ, मुलुंड, मुंबई यांनी संस्थेस (२०००/-) दोन हजार रुपयांची देणगी दिली.

२) श्री. रंगा मराठे पुणे - ३० यांनी संस्थेस ग्रंथालय विकासासाठी (१०००/-) एक हजार रुपयांची देणगी दिली.

३) कीर्तनकार श्रीमती पुष्पलता रानडे, पुणे - ३० यांनी पती कै. राजाभाऊ रानडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त ८-६-२००१ रोजी परिषदेच्या कार्यालय व सभागृह येथे लावण्यासाठी चार मोठी घड्याळे भेट म्हणून दिली.

मराठी साहित्यसृष्टीतील अभिनव उपक्रम
म.सा.परिषदेने सिद्ध केलेला
अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास खंड - १

**' A HISTORY OF MODERN MARATHI LITERATURE ' VOL. I**

■

संपादक
श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर

पृष्ठसंख्या ३५० किंमत रु. ४००/- ग्रंथ विक्रेत्यांना भरपूर सूट
वैयक्तिक ग्राहकांनीही सवलतीसाठी संपर्क साधावा.

या ग्रंथाचा दुसरा खंड यथावकाश प्रसिद्ध होत आहे.

■

संपर्क : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

## देणगीबद्दल धन्यवाद

| | | | |
|---|---|---|---|
| १) | शुक्ल नंदकिशोर | चाळीसगाव | रु. ३००/- |
| २) | कोगेकर स. वा. | पुणे | रु. ४००/- |
| ३) | दीक्षित वसंत | औरंगाबाद | रु. ५१५/- |
| ४) | गुंडी नीलिमा | पुणे | रु. २००/- |
| ५) | मोडक मालिनी शंकर | पुणे | रु. ३००/- |
| ६) | शिंदे विष्णू गेनू | आसगांव वसाहत, सातारा | रु. ३००/- |
| ७) | अत्रे निर्मला द. | पुणे | रु. ३००/- |
| ८) | जोशी गणेश लक्ष्मण | खोपोली | रु. ३००/- |
| ९) | थत्ते गजानन परशुराम | मुंबई | रु. ३००/- |
| १०) | शिरपूरकर सुरेश रामचंद्र | कोल्हापूर | रु. ५००/- |
| ११) | सोनावणे विश्वास ग. | धुळे | रु. १०१/- |
| १२) | न्या. वेहरे प्र. ना. | पुणे | रु. ८००/- |
| १३) | कानिटकर मधुसुदन शंकर | पुणे | रु. ३००/- |
| १४) | पेठे गो. व्यं. | मुंबई | रु. ४००/- |
| १५) | रानडे अनिल गणेश | पुणे | रु. ४००/- |

श्री. वायु. व्ही. देशमुख यांनी शि.म. परांजपे पारितोषिकासाठी रु.१०,०००/- देणगी दिली आहे. त्यामुळे हे पारितोषिक आता रु. १,०००/- चे झाले आहे.

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika Quarterly April, May, June 2001.
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

प्रति,



प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका